आहे. आत्मसाक्षात्काराचे मार्गांच्या अनुभवाचे पहिले दृश्य जो आरक्त वर्ण, तो या चक्रावर धारणा धरल्यास दिसू लागतो! आधारचक्राचे महत्त्व पुष्कळ वर्णिले आहे व ते फार बहारीचे आहे. याठिकाणी विश्वाची उत्पत्ति व लय होतो. विद्युत्पुंजाप्रमाणे प्रकाश येथे दिसतात! आधार हे घराचे कवाडाप्रमाणे (लहान दाराप्रमाणे) आहे. हे एकदा उघडले म्हणजे स्वगृहांत प्रवेश होतो! आधारशक्तीचे ज्ञान झाले म्हणजे त्रैलोक्याचे ज्ञान होते. सर्व पापापासून तो मुक्त होतो व ब्रह्मस्वरूपाप्रत प्राप्त होतो!

या आधारचक्रावर ताबा मिळविणे किती महत्त्वाचे व जरुरीचे आहे हे कळून येईल. तो कसा मिळवायचा हा मोठा अवघड प्रश्न आहे. श्रद्धा ठेवून नियमितपणाने मनोलय व प्राणलयाचा अभ्यास केल्यास त्या प्रश्नाचा उलगडा होईल. सहस्रदलकंमलापासून हे मूल आधारकमल शेवटचे व दूरचे आहे. तसेच सिंपथॅटिक सिस्टिमपैकी अत्यंत महत्त्वाचा भाग जे नाभिकमल की, ज्यास Abdominal Brain पोटांतील मेंदू असे म्हणतात, त्यापासूनही हे कमल दूर आहे. ह्यास गेलेले ज्ञानतंतू शेवटचे आहेत. ह्या अग्रभागी असलेल्या ज्ञानतंतूंवर ताबा मिळविता आला म्हणजे क्रमाने हळूहळू वर वर असलेल्या चक्रांवर ताबा मिळवितां येतो व प्राण योग्य मार्गाने जाऊन शेवट गाठता येतो ह्यास एक दृष्टांत देऊन हे प्रकरण पुरे करू.

एका मोठ्या राजाच्या पदरी एक कारभारी होता. कांही कारणाने राजाची त्याच्यावर इतराजी झाली तेव्हा राजाने त्यास एका उंच

मनोऱ्यावर अगदी वरच्या कोठडीत कैद करून ठेवले. ही गोष्ट त्याच्या पत्नीस कळतांच ती त्या मनोऱ्याकडे धावत आली व खाली उभे राहून तिने पतीला हाक मारिली. वरील खिडकींतून तोंड बाहेर काढून कारभारी म्हणाला, "रात्री तू इकडे ये, आणि येताना एक जाड दोरखंड, तितकीच बारीक सुतळी, थोडा रेशमी दोरा, थोडा शिवावयाचा दोरा व एक नाकतोडा प्राणी आणि थोडासा मध बरोबर घेऊन ये." पतीने सांगितलेले सर्व जिन्नस बरोबर घेऊन ती रात्री तिथे आली. तेव्हा तो कारभारी तिला म्हणाला, "रेशमी दोऱ्याने नाकतोड्याचे शेपूट बांध. त्याच्या मिशांस थोडासा मध लावून त्यास या खिडकीकडे तोंड करून सोड." तिने याप्रमाणे करतांच मधाचे वासाने लोभावलेला तो प्राणी वर वर जाऊं लागला. आपण आणखी थोडे वर गेलो म्हणजे मध खावयास मिळेल असे त्यास वाटत होते. वर जातां जातां तो खिडकीपाशी गेला. त्याबरोबर त्या कारभाऱ्याने त्यास पकडून त्याच्या शेपटीचा रेशमी दोरा हस्तगत करून घेतला. नंतर त्या रेशमी दोऱ्याच्या खालच्या टोकास शिवावयाचा दोरा बांधावयास त्याने आपल्या पत्नीस सांगितले व रेशमी दोरा व त्याच्या साहाय्याने जाड सुतळी व तिच्या साहाय्याने ते जाड दोरखंड त्याने वर ओढले. दोरखंड वर आल्याबरोबर त्याचे एक टोक खिडकीच्या एक गजास बांधून तो त्या दोरावरून खाली आला व अशा रीतीने मोठ्या युक्तीने त्याने आपली सुटका करून घेतली.



Aorlic Plexus

२ स्वाधिष्ठान-चक्र दलें ६



## प्रकरण ३ रे

### स्वाधिष्ठान चक्र - Arotic Plexus

**स्वशब्देन भवेत्प्राणः स्वाधिष्ठानं तदाश्रयम्।**
**स्वाधिष्ठानं ततश्चक्रं मेढमेव निगद्यते॥**

**- ध्यानबिंदु ४८**

ज्ञानचक्रांपैकी दुसरे स्वाधिष्ठान चक्र होय. ह्या चक्रास सिंपथॅटिक नर्व्हस प्लेक्सेसपैकी Aortic Plexus (एओर्टिक प्लेक्सस) म्हणण्यास हरकत नाही.

### स्थान - Position

स्वाधिष्ठान चक्र हे उपस्थेंद्रियाच्या पातळीत पाठीतील कण्याचे पुढच्या भागावर आहे. पाठीतील कण्यापैकी ज्यास Lumber Region (लंबर रिजन) म्हणतात त्याच्या शेवटच्या दोन तीन मणक्यांचे पुढे हे चक्र आहे. प्रथम शारीरिक शास्त्राच्या दृष्टीने याचे वर्णन काय आहे ते पाहूं. हृदयापासून जी मोठी शुद्ध रक्तवाहिनी निघाली आहे ती कण्याच्या पुढूनच कटीरदेशापर्यंत जाते. हीस एओर्टा म्हणतात. या मोठ्या रक्तवाहिनीच्या पोटांतील जो भाग आहे त्यास Abdominal Aorta (अॅबूडॉमिनल एओर्टा) असे म्हणतात. या भागाचे पुढच्या अंगास ज्ञानतंतूंची जाळी आहेत. म्हणून ह्या चक्रास एओर्टिक प्लेक्सस असे म्हणतात. या चक्रापासून मोठ्या आंतड्याच्या पुष्कळशा भागास, गुदास व अंडकोशाकडे

ज्ञानतंतू गेलेले आहेत. ह्या सर्व अवयवांच्या क्रियेवर या चक्राचा ताबा चालतो, या चक्राचे सहा भाग आहेत. तीच याची दले होत. ती अशी :-

## दले - Plexuses

(१) Spermatic (स्पेरमॅटिक):- या दलाच्या कांही भागापासून अंडद्वयाकडे ज्ञानतंतू गेलेले आहेत. अंडकोशातील वीर्योत्पादनावर याचा ताबा चालतो.

(२) Left Colic (लेफ्ट कॉलिक):- मोठ्या आंतड्याचा प्लीहेपासून जो उतरता भाग आहे त्याकडे यांतील ज्ञानतंतू गेले आहेत. त्या भागावर याचा ताबा चालतो.

(३) Segmoid (सेग्मॉइड):- मोठे आंतडे कटीराचे डाव्या भागांत आल्यावर त्याचा आकार लहान होतो. याठिकाणी पृष्ठभागास ते चिकटलेले आहे. ह्या आंतड्याचे भागास सेग्मॉइड असे म्हणतात. ह्या भागास या दलापासून ज्ञानतंतू येतात. अन्नरसाचे पचन झाल्यावर त्यांतील टाकाऊ भाग मलरूपाने जेव्हां मोठ्या आंतड्याच्या या सेग्मॉइड भागापर्यंत येतो त्यावेळी या चक्रापासून निघणाऱ्या ज्ञानतंतूंच्या प्रेरणेने आपणांस मलोत्सर्गाची संवेदना उत्पन्न होते. त्यावरून या चक्रावर ताबा मिळविता आला म्हणजे ठरावीक वेळी व इच्छेप्रमाणे मलोत्सर्ग करणे ही आपल्या हातची गोष्ट रहाते.

(४) Superior Haemorrhoidal (सुपीरिअर हेमरॉइडल) :- मोठ्या आतड्याचा शेवटला भाग ज्यास गुद

(Rectum) असे म्हणतात, त्याचे वरचे भागाकडे या दलापासून ज्ञानतंतू गेलेले आहेत. तेव्हा अर्थात् ह्या भागावर या चक्राचा ताबा चालणे स्वाभाविक आहे. मूळव्याध, भगंदर वगैरेसारखे रोग होऊ न देणे किंवा झाले असतां बरे करणे ह्या गोष्टी या चक्रावर ताबा मिळवितां आला म्हणजे सहज शक्य आहेत.

(५) Inferior Messenteric (इन्फिरिअर मेसेंटेरिक) :- एओर्टाच्या - मोठ्या रक्तवाहिनीच्या - शेवटच्या भागापासून मोठ्या आतड्याकडे जाणारी एक रक्तवाहिनी निघते. तिच्याभोवती हे चक्र आहे. मोठ्या आतड्याकडे रुधिराभिसरणाचा प्रवाह कमी अधिक करणे ही गोष्ट या दलावर ताबा मिळाल्याने साध्य होणारी आहे हे सहज लक्षांत येईल.

(६) Hypo Gastric (हायपोगॅस्ट्रिक) :- कटीर प्रदेशांतील अवयवांना या चक्रापासून ज्ञानतंतू गेलेले आहेत. तेव्हा त्या दलावर ताबा मिळविला म्हणजे कटीर प्रदेशांतील (ओटीपोटांतील) अवयवांच्या क्रिया आपल्या स्वाधीन ठेवता येतील.

स्वाधिष्ठान चक्राचे शरीरशास्त्रदृष्ट्या विवेचन केल्यावर आतां वेदांत व योगशास्त्रदृष्ट्या विवेचन खाली करीत आहो. एओर्टिक प्लेक्ससचे ६ भाग कल्पिले आहेत. तशी स्वाधिष्ठान चक्राची ६ दले कल्पिली आहेत. पुढील विवेचन तुलनात्मक दृष्टीनें वाचावे.

**स्वाधिष्ठानाव्हयं चक्र लिंगमूले षडश्रके।**

**- योगशिखा १:७२**

**स्वाधिष्ठानं षड्दलम्।**

**- योगचूडामणि ४**

स्वाधिष्ठान नांवाचे चक्र उपस्थ इंद्रियाचे ठिकाणी वसत आहे. यास ६ दले आहेत. अपानवायु याचे आश्रयाने आहे. वगैरे वर्णन योगशिखा, योगचूडामणि, ध्यानबिंदु वगैरे उपनिषदांत आहे हे उपरिनिर्दिष्ट औपनिषद्वाक्यावरून दिसून येईल. या षड्दलांकित चक्रामध्ये ब, भ, म, य, र, ल, हे सहा वर्ण आहेत. ही सहा बीजे ह्या कमलाच्या एक एक पाकळीत आहेत. या प्रत्येक दलांत एक एक शक्ति वास्तव्य करते. १ अव्यंगता, २ शारदा ३ वाणी ४ अमृता ५ पूर्णा ६ रोहिणी या शक्ति होत. ह्या प्रत्येक शक्तीपासून निरनिराळ्या स्वरूपाच्या आनंदाची प्राप्ति होते. त्यांची नांवे सप्तचक्रविवरण कोष्टक दिले आहे त्यांत पहावी. या चक्राची देवता ब्रह्मा ही मानली आहे. विघ्नहर्ता श्रीगजाननाचे ध्यान अगर स्मरण केल्यानंतर ब्रह्मदेव हा सृष्टि उत्पन्न करणारा असल्यामुळे या लिंगस्थानाचे ठिकाणी असलेल्या स्वाधिष्ठान चक्राचे ठिकाणी त्याचे अधिष्ठान मानणे योग्य आहे. या ठिकाणी सप्तवारांपैकी बुधवारची कल्पना केली आहे. मोक्षदायक अशा सप्तपुरींपैकी कांची नामक नगरी येथे आहे असे मानले आहे. साक्षात्काराचे मार्गांतील प्रकाशाचे अनुभवापैकी पीतवर्ण हा, या चक्राचे ठिकाणी ध्यान धरल्यावर दृग्गोचर होतो! पृथ्वीतत्त्व, स्थूलदेह व जागृत अवस्था ही सर्व येथे मानली आहेत. अपानवायूचे वास्तव्य येथे आहे. उपवायूंपैकी धनंजय नामक वायु येथे भ्रमण करतो. हा

शब्दउत्पत्ति करतो. मृत्यूनंतर कांही काल हा असतो असे घेरंडसंहितेत सांगितले आहे.

**भवेद्धनंजयाच्छब्दः।**

**न जहाति मृतं वाऽपि। -घेरंडसंहिता ५-६४-६५**

मागे शरीरशास्त्राप्रमाणे वर्णन केले आहे, ते वर्णन व येथील वर्णन पाहिले म्हणजे साम्य दिसून येईल. अपानवायूचे जडरूप म्हणजे पोटांतील आंतड्यात जो वायु धरतो (गॅसेस धरतात) असे आपण मानितो ते होय. हे गॅसेस पचनक्रिया बरोबर न झाल्यामुळे धरतात. पचनक्रिया ही आंतड्यातील रसोत्पादक पिंडावर बरीचशी अवलंबून आहे. या रसोत्पादक पिंडास व आंतड्याचे आकुंचन व प्रसरणात्मक क्रियेस चालना देणारे सिंपथॅटिक नर्व्ह फायबर्स आहेत. ते या चक्रापासून निघतात. अपानवायूच्या शक्त्यात्मक रूपाचे भ्रमण या ठिकाणी असल्यामुळे मोठ्या आंतड्याच्या बहुतेक भागांवर ताबा मिळवितां येतो. आंतडी मलविसर्जन करून साफ राखणे, वेळोवेळी व इच्छेनुरूप शौच करणे व गुदावर ताबा मिळविणे इत्यादि क्रिया साध्य होतात. तसेच अपानवायूवर ताबा मिळविला म्हणजे तो ऊर्ध्वगत करून वर चढवितां येतो व पुढील मणिपूर चक्रावर प्राण व अपान यांचे ऐक्य स्थापन करतां येते!

पाश्चात्त्य लोकांपैकी वेदांती म्हणविणारे कित्येक लोक स्वाधिष्ठान चक्राऐवजी Spleen or Splenic Chakra (स्प्लीन किंवा स्प्लेनिक चक्र) प्लीहाचक्र मानतात. त्यांच्या

मताप्रमाणेच हे चक्र प्लीहेच्या ठिकाणी आहे. आपल्या वेदांतशास्त्र, योगशास्त्र, व मंत्रशास्त्र या दृष्टीने विचार केला म्हणजे ही कल्पना चुकीची आहे असे दिसून येईल. मनोलयाचा किंवा प्राणलयाचा अभ्यास करतांना जेव्हां चित्ताची एकाग्रता होऊं लागते तेव्हां प्राणाची गति एका रेषेत ऊर्ध्व होऊ लागते, असा अनुभव येईल. प्राण मूलाधार चक्रावरून सरळ वर स्वाधिष्ठान चक्रावर जातो, नंतर नाभिकमलावर जातो. तेथे तो सुषुम्नापंथाने वर सरळ चक्रभेदन करीत जातो. यावरून असे दिसून येते की, प्राण सरळ रेषेत वर जातो. पांथरीचे ठिकाणी चक्राची कल्पना केल्यास प्राणाची गति वांकडी होऊन वर जाते व पुन्हां खाली नाभिकमलावर येते असे कल्पावे लागेल. कारण प्लीहा-पांथरी ही पोटांत बेंबीचे डाव्या भागांत वरचे बाजूस आहे. तेव्हा प्लीहाचक्राची कल्पना पचनी पडणार नाही. त्यांच्या मताप्रमाणे "हे चक्र, या स्थूल देहाहून भिन्न असलेला, जडरूपांत पण चर्मचक्षूस अदृश्य असा, जो दुसरा देह आहे त्याचे बाह्य भागावर आहे. बाह्यशक्ति काटकोनांत वाहते. अंतरशक्ति वाटोळी फिरते व लाटाकार होते म्हणून रंगाच्या लहरी दिसतात त्यास दले म्हणातात. ज्याला गुरुकृपेने अतींद्रियज्ञान प्राप्त झाले त्यासच ही चक्रे प्रकाशरूपांत दिसतात" वगैरे त्यांची मते आहेत. ही मते आपल्या वेदांतादि शास्त्रांत कितपत पटतील याचा सूज्ञांनी विचार करावा. ते स्वाधिष्ठान चक्र मानीत नाहीत. यास कारणे अशी देतात की, या चक्राचे उत्थापन (Arousing) झाले की

भयंकर संकट उत्पन्न होईल! व ही एक दुर्दैवाची गोष्ट आहे. चक्राचे ज्ञान झाल्यानंतर ते प्रकाशरूपांत दिसते असे मानल्यावर ते चक्र ज्या स्थानी आहे त्या अवयवांस काय महत्त्व राहते ते सांगणे कठीण आहे. चक्राचे उत्थापन म्हणजे ज्ञान. ते अतींद्रिय आहे. उत्थापन म्हणजे चक्राच्या स्थानाचे उत्थापन नव्हे. तेव्हां पाश्चात्त्यांची मते वाचून एवढी भीती बाळगणे भ्रामकपणाचे होईल. असो. सर्व शास्त्रांच्या दृष्टीने विचार करतां स्वाधिष्ठान चक्रच मानणे बरोबर होईल व ते खरे आहे. वाचकांनी याचा अनुभव घेऊन पहावा.



Solar Plexus

३ मणिपूर-चक्र दलें १०





## प्रकरण ४ थे

# मणिपूर ऊर्फ नाभिकमल

## Solar Plexus or Abdominal Brain

**नाभिदेशे स्थितं चक्र दशास्त्रं मणिपूरकम् ॥**

**- योगशिखा ५-९**

ज्ञानचक्रांपैकी तिसरे ज्ञानचक्र महत्त्वाचे आहे. या तिसऱ्या चक्राला मणिपूर ऊर्फ नाभिकमल असे म्हणतात. या चक्रास सिंपथॅटिक नर्व्हस सिस्टिमपैकी Solar Plexus (सोलर प्लेक्सस) म्हणण्यास हरकत नाही. याचे फार महत्त्व आहे. आपल्या मेंदूमध्ये (Brain) ज्याप्रमाणे पांढरी व निळी वस्तु (White and Gray Matter) आहे व तिची निरनिराळी कार्ये आहेत, त्याप्रमाणे या चक्राचे ठिकाणी या दोन्ही वस्तु आहेत. म्हणून त्यास पोटांतील मेंदू (Abdominal Brain) असे नांव देण्यात आले आहे! आपल्या डोक्यांतील मेंदूचे किती महत्त्व आहे हे निराळे सांगण्याचे कारण नाही. त्यावर शरीरांतील सर्व क्रिया अवलंबून आहेत. तद्वतच या चक्रास मेंदू असे नामाभिधान दिले आहे. यावरून याचेही किती महत्त्व आहे व यावर शरीरांतील सर्व क्रिया कशा अवलंबून आहेत हे दिसून येईल. हे सूर्यासारखे तेजस्वी आहे! सूर्य उदय पावला म्हणजे पृथ्वीवर सर्वत्र प्रकाश पडतो त्याप्रमाणे येथे वसत असलेल्या कुंडलिनी शक्तीचा उदय झाला म्हणजे आत्मरवीचा प्रकाश

सर्वत्र पडतो. म्हणून यास सूर्यासारखे तेजस्वी (Solar) असे सूर्यवाचक नांव दिलेले असावे!

हे चक्र सर्वात मोठे आहे. कण्याच्या दोन्ही बाजू, गँग्लिया, सीलिअॅक गँग्लिया व ज्ञानतंतूंची अगदी दाट जाळी यांचे हे चक्र बनले आहे. आमाशयाकडे व आंतड्याकडे जाणाऱ्या रक्तवाहिनी (Caeliac Artery) चे उगमाभोवती यांची जाळी आहेत. आमाशयाचे मागे व Diphram (डायाफ्रॅम) - छाती व पोट यामधील पडदा व महास्रोतस (अॅब्डॉमिनल एओर्टा) यांचे पुढे हे पसरलेले आहे. यापासून पुष्कळ रक्तवाहिन्यांना ज्ञानतंतू गेले आहेत.

## स्थान - Position

नाभी म्हणजे बेंबी. ह्याठिकाणी हे चक्र आहे असे मानतात. शाखाचंद्रन्यायाने याचा लाक्षणिक अर्थ घ्यावयाचा हे मागे सांगितले आहे. तदनुरूप नाभीचे ठिकाणी म्हणजे नाभीचे समांतर पातळीत आपल्या कण्याचे पुढचे बाजूस ह्या चक्राचे स्थान आहे असे समजावे. कण्याचा जो पाठीतील भाग Lumbar Region (लंबर रिजन) यांतील पहिल्या मणक्याचे पुढील अंगास हे चक आहे. या चक्राचे अत्यंत महत्त्व आहे. कारण पोटांतील सर्व अवयवांवर याचा ताबा चालतो. याठिकाणी कुंडलिनी शक्तीचे वास्तव्यस्थान आहे. प्राण व अपान यांचे ऐक्य करण्याचे व मध्यमार्ग स्वीकारण्याचे हे स्थान होय! शारीरिक वैद्यकशास्त्रदृष्ट्या याचे काय वर्णन आहे ते

पाहूं. ते कळले म्हणजे आमच्या योगशास्त्राशी ते तंतोतंत कसे जमते ते लक्षांत येईल. याची दहा दले (Plexuses) आहेत. ती अशी -

## दले - plexuses

(१) Phrenic (फ्रेनिक):- या दलामधून डायाफ्रॅम पडदा व वृक्काकडे (सुप्रारीनल ग्लँड्स) ज्ञानतंतू जातात. डायाफ्रॅम ह्या पडद्याचे श्वासोच्छ्वासाचे क्रियेत अत्यंत महत्त्व आहे. तेव्हा यावर ताबा मिळविता येतो.

(२) Hepatic (हिपॅटिक):- हे सर्वांत मोठे दल आहे. येथून सर्व क्रिया चालतात. यकृताच्या आंत-बाहेर जाणाऱ्या व यकृतात फिरणाऱ्या सर्व रक्तवाहिन्यांवर याचा ताबा आहे. आमाशयाकडे (स्टमक) जाणाऱ्या रक्तवाहिन्यांसही येथून ज्ञानतंतू मिळतात.

(३) Splenic (स्प्लेनिक):- प्लीहा व याच्या रक्तवाहिन्या यांचे कियेवर या दलाचा ताबा आहे.

(४) Superior Gastric (सुपीरिअर गॅस्ट्रिक):- आमाशयाच्या वरच्या बाकदार लहान भागाकडे याचे ज्ञानतंतू गेलेले आहेत.

(५) Supra-Renal (सुप्रारीनल):- वृक्कावर या दलाचा ताबा आहे. या अवयवाचे मानाने याकडे जाणारे ज्ञानतंतू मोठे आहेत. हल्ली या अवयवाचे महत्त्व किती आहे हे सर्वसाधारण सुशिक्षितास ठाऊक आहे. शरीराच्या साधारण पोषणाचे क्रियेत

या अवयवाचा फार मोठा भाग आहे असे आतां ठरले आहे. तेव्हा साहजिकच याकडे मोठे ज्ञानतंतू जातात.

(६) Renal (रीनल):- मूत्रपिंडाकडे यांतून ज्ञानतंतू गेले आहेत. मूत्रपिंडाच्या सर्व क्रिया या दलावर अवलंबून आहेत. येथून काही तंतू अंडकोशाकडे जाणाऱ्या शिरेकडे व मूत्रवाहिनीकडे गेले आहेत.

(७) Spermatic (स्पेरमॅटिक):- पुरुषांत अंडकोशाकडे जाणाऱ्या शिरेकडे या दलांतून ज्ञानतंतू जातात. बायकांत ओव्हरी (गर्भपिंड) व गर्भाशयाचा मोठा भाग याकडे ज्ञानतंतू जातात. त्यामुळे त्यास Ovarian Plexus (ओव्हेरिअन प्लेक्सस) असे नांव मिळते. जीवोत्पादक अवयवावर या दलाचा ताबा चालतो हे दिसून येईल. या आणि वरील सहाव्या दलाचा फार निकट संबंध आहे. या दोन्ही पाकळ्या चिकटल्या आहेत असे आपण मानू. याचे प्रत्यंतर म्हणजे मूत्रपिंडांत जेव्हा अश्मरी होतो तेव्हां कंबरेत व पोटांत तीव्र वेदना होतात तशा अंडामध्येही वेदना होऊं लागतात. वैद्य लोकांचे पाहण्यांत हे लक्षण असेलच.

(८) Superior Mesenteric (सुपीरिअर मेसेंटेरिक):- अंत्रावरण व लहान आंतड्याचे सर्व भाग या सर्वांच्या क्रिया या दलावर अवलंबून आहेत.

(९) Pancreatic (पँक्रिएटिक):- पँक्रिआज यास जठर म्हणण्यास हरकत नाही. कारण हा अन्नरस पचविण्याचे कामी फार उपयोगी आहे. या अवयवास या दलांतून ज्ञानतंतू जातात.

(१०) Colic (कॉलिक):- लहान आंतड्याचे भाग, लहान व मोठे आंतडे यांचा संधि-भाग, मोठ्या आंतड्याचा पहिला व दुसरा भाग, एकूण लहान व मोठ्या आंतड्याच्या बऱ्याच भागाकडे यांतून ज्ञानतंतू जातात.

वरील वर्णन वाचल्यावर सहज ध्यानी येईल की, अन्नाचे पचन, शोषण, रसोत्पादन, मलविसर्जन यासंबंधी; मूत्राशयासंबंधी सर्व क्रिया; तसेच प्रजोत्पत्ति आणि कांहीशा श्वासोच्छ्वास व रुधिराभिसरण या अत्यंत महत्त्वाच्या क्रिया या चक्रावर अवलंबून आहेत. या चक्रांतून वरती अनाहत चक्राकडे काही ज्ञानतंतू गेले आहेत व खाली स्वाधिष्ठानाकडे काही गेले आहेत. या चक्राचे शरीरशास्त्राप्रमाणे चित्र काढले तर ते कमलाचे आकृतीप्रमाणे बरोबर येते! मग आमचे योगशास्त्रांत या ज्ञानचक्रांना कमलाची उपमा दिलेली आहे ती कल्पनारम्य व काव्यमय का वाटावी?

दोन्ही शास्त्रांप्रमाणे त्यांची स्थाने जमतात. दलांची संख्या व दलांचे वर्णन जमते. एवढेच नव्हे तर प्रत्यक्ष ठेवणीची आकृतीही जमते. तेव्हां ज्ञानचक्रे ही Sympathatic Plexuses (सिंपथॅटिक प्लेक्सेस) आहेत हे निश्चित समजण्यास हरकत नाही.

आपल्या शास्त्रानुसार याचे वर्णन कसे आहे ते पहा. मणिपूर ऊर्फ नाभिकमल हे तिसरे चक्र आहे. यास दहा पाकळ्या - दले - आहेत. त्या प्रत्येक पाकळीत अनुक्रमे ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, व फ असे दहा वर्ण आहेत. ह्यांस मातृका

किंवा बीजे म्हणतात. पंचप्राणांपैकी समान वायूचे हे राहण्याचे ठिकाण आहे. उपवायूंपैकी कृकल या नांवाचा वायु येथे वास्तव्य करतो. कृकल (कृकर) वायु हा क्षुधा व तृषा उत्पन्न करतो. शिंक येणे हे त्याचे कार्य आहे. येथे परा ही श्रेष्ठ वाणी आहे. ही स्फुरणरूप आहे. तिन्ही वाचांचा लय या वाचेत व्हावयास पाहिजे. म्हणजेच हिचे ज्ञान होते. विष्णु या देवतेचे येथे अधिष्ठान आहे. मूलाधार चक्रावर श्रीगजाननाचे स्मरण केल्यावर व स्वाधिष्ठानावर सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचे दर्शन घेऊन आल्यावर साहजिकच या स्थानी जगताचे पालन करणाऱ्या श्रीविष्णूचे दर्शन होते! विष्णु शरीरांतील, यकृत, पांथरी, आमाशय, पक्वाशय, वृक्क वगैरे महत्त्वाचे अवयवांचे रक्षण करून देहाचे पोषण करितो. सप्तपुरींतील अवंती ही नगरी येथे मानली आहे.

गुरुकृपेने येथे वसत असलेली कुंडलिनी उत्थापन होत असल्यामुळे सप्तवारांपैकी गुरुवारची येथे योजना केली आहे. या कमलाचा नीलवर्ण आहे. प्रत्येक पाकळीचे ठिकाणी एक एक शक्ति आहे व त्या ठिकाणी एक एक आनंदाची प्राप्ति होते. त्या आनंदांची नावे कोष्टकात दिली आहेत. या ठिकाणी गेल्यावर विष्णूचे सान्निध्यांत समीपता ही मुक्ति मिळते.



*Cardiac Plexus*

४ अनाहत-चक्र दलें १२





## प्रकरण ५ वे

## अनाहत चक्र ऊर्फ हृत्कमल - Cardiac Plexus

**द्वादशारं महाचक्रं हृदये चाप्यनाहतम्।**

**- योगशिखा ५-९**

सप्त ज्ञानचक्रांपैकी अनाहत हे चवथे चक्र आहे. ह्यास हृत्कमल म्हणतात. हे हृदयाचे ठिकाणी छातीत आहे. म्हणून यास हृत्कमल असे नामाभिधान प्राप्त झाले आहे. ज्यास इंग्रजींत हार्ट म्हणजे हृदय म्हणतात त्याचे मागे हे चक्र आहे. म्हणून शरीरशास्त्रांतही त्यास सिंपथॅटिक प्लेक्ससपैकी Cardiac Plexus (कार्डिॲक प्लेक्सस) असे यथायोग्य नांव दिले गेले आहे. छातीच्या फासळ्यांचे पिंजऱ्यांत सुरक्षित ठेवलेल्या फुप्फुस व हृदय यासारख्या अत्यंत महत्त्वाच्या शरीरांतील अवयवांवर याचा ताबा चालतो. शरीराचे जीवन अशा हृदयासच या चक्राने व्यापले आहे असे दिसेल! तेव्हा याचे महत्त्व किती आहे हे लक्षांत घ्यावे. ह्यावर ताबा मिळविला म्हणजे प्राणावरच ताबा मिळविल्यासारखे होईल. ह्या चक्रास अनाहत असे नांव मिळण्याचे कारण आहे. ह्या चक्राचे ठिकाणी मनाचे वास्तव्य मानिले आहे. येथे प्राण आला की, मन व प्राण यांचे ऐक्य होते. चित्ताचे एकाग्रतेमुळे प्राण व मन यांचा लय होऊ लागला म्हणजे श्रोत्रेंद्रियाचे ठिकाणी अतींद्रिय ज्ञान (Special Sense) उत्पन्न होऊं लागले की त्यावेळी कर्णामध्ये विशिष्ट प्रकारचे ध्वनि उत्पन्न होतात त्यास

अनाहत किंवा अनुहत ध्वनि असे म्हणतात. किंकिणी, चिंचिणी, घंटानाद, वीणारव, भ्रमरगुंजारव वगैरे प्रकारचे चढते असे हे दशविध ध्वनि अगर नाद आहेत. बाह्यसृष्टींतील आघातजन्य ध्वनि श्रोत्रेंद्रियास विशिष्ट मर्यादेपर्यंतच ऐकू येतात, पण जसजसे हे चक्रभेदन होईल तसतसे अनूआहत म्हणजे आघाताशिवायच नाद कर्णामध्ये उत्पन्न होऊं लागतात म्हणून ह्या चक्रास अनाहत असे सार्थ नामाभिधान देण्यात आले आहे.

## **स्थान** - Position

शरीरशास्त्रदृष्ट्या याचे वर्णन कसे केले आहे ते पाहूं. सिंपथॅटिक नर्व्हस सिस्टिमपैकी हे कार्डिॲक प्लेक्सस, पृष्ठवंशापैकी छातीचे Thoracic (थोरसिक) भागांतील जे बारा मणके आहेत त्यांतील पाचव्या सहाव्या मणक्याचे पुढचे अंगास आहे. सहज लक्षांत ठेवावयाचे म्हणजे हृदयाचे (हार्टचे) मागे हे आहे. या चक्राच्या उपयोगाचे बरोबर ज्ञान होण्यास हृदयाची रचना थोडक्यांत देणे जरूर आहे.

आपले हृदय हे दोन फुप्फुसांमध्ये डावे बाजूस साधारणपणे डावे स्तनाखाली आहे. यांत सर्व शरीरांतील अशुद्ध रक्त वरून व खालून रक्तवाहिन्यांतून येते. नंतर येथून ते फुप्फुसाकडे शुद्ध होण्यास जाते व तेथून ते शुद्ध होऊन परत हृदयांत आले म्हणजे पुनः ते सर्व शरीरभर फेकले जाते. शुद्ध रक्ताची जी मूळ थोरली वाहिनी ती फार मोठी आहे म्हणून तिला एओर्टा (किंवा महास्रोतस असे म्हणू) म्हणतात. तो प्रथम वर मानेकडे जातो,

लगेच त्यांची कमान होते. नंतर तो खाली सरळ जातो व पुढे पोटांत आल्यावर बेंबीचे खाली त्याचे दोन भाग होतात. असो.

हृदयाचे प्रथम दोन उभे भाग झाले आहेत. एक उजवा व दुसरा डावा. पुनः आडवे प्रत्येकाचे दोन दोन भाग झाले आहेत. एक वरचा व एक खालचा असे एकूण चार भाग झाले आहेत. वरच्या दोन्ही भागांस ऑरिकल्स म्हणतात. खालचे दोन्ही भागांस व्हेंट्रिकल्स म्हणतात. ऑरिकल्समध्ये अशुद्ध रक्त असते. व्हेंट्रिकल्समध्ये शुद्ध रक्त असते. हृदयास एक बाहेरून आवरण आहे व एक आंतून पातळ आवरण आहे. मध्ये खूप जाड असे स्नायू आहेत. हृदयाचे स्नायूस पोषण्याकरितां रक्तवाहिन्या व ज्ञानतंतू त्यांत पसरलेले आहेत. एवढे वर्णन विषय कळण्यास पुरेसे आहे. आता या चक्राची बारा दले (Plexuses) आहेत त्यांचे वर्णनाकडे वळूं. ती अशी :-

## दले - Plexuses

(१) Right Deep Cardiac (राइट डीप कार्डिॲक):- प्रत्येक फुप्फुसाकडे जाणारे असे श्वासनलिकेचे दोन भाग जेथे होतात त्याठिकाणी, महास्रोतसाच्या कमानीचे भागामागे हे दल आहे. उजवे फुप्फुसामध्ये याचे ज्ञानतंतू गेलेले आहेत. तसेच हृदयाच्या चार खोल्यांपैकी उजव्या बाजूचे वरचे खोलीकडे ज्यास राइट ऑरिकल म्हणतात त्याकडे याचे ज्ञानतंतू गेलेले आहेत. म्हणजे उजवे फुप्फुस व हृदयाचा उजवा कांही भाग या महत्त्वाचे अवयवांवर याचा ताबा चालतो.

(२) Left Deep Cardiac (लेफ्ट डीप कार्डिॲक):- हे दल हृदयाच्या मागच्याच बाजूस आहे. याचा ताबा हृदयाच्या डाव्या बाजूचे वरचे खोलीवर ज्यास लेफ्ट ऑरिकल म्हणतात त्यावर चालतो.

(३) Antirior Pulmonary (अँटीरिअर पल्मोनरी):- फुप्फुसासारख्या अत्यंत महत्त्वाच्या अवयवास व त्याचे आवरणास ज्यास फ्ल्यूरा (Pleura) असे म्हणतात, त्याकडे यांतून ज्ञानतंतू गेले आहेत.

(४) Postirior Pulmonary (पोस्टिरिअर पल्मोनरी):- यांतूनही फुप्फुसाकडे व त्याचे आवरणाकडे ज्ञानतंतू गेले आहेत.

(५) Superficial Cardiac (सुपरफिशिअल कार्डिॲक):- हे दल महास्रोतसाचे खाली आहे. त्यांतून हृदयाचे बाह्य आवरण - पेरिकार्डियम असे ज्यांस म्हणतात - त्याकडे ज्ञानतंतू जातात.

(६) Cardiac Ganglian of Wrisberg (कार्डिॲक गँग्लिअन):- वरच्याचे अगदी शेजारी हे दल आहे.

(७) Right Coronary (राइट करोनरी):- हे दल वरच्या दलाचे मागचे भागास आहे. प्रत्यक्ष हृदयाचे स्नायूस ज्या रक्तवाहिन्यांच्यायोगे पोषण होते अशा करोनरी नावाच्या रक्तवाहिन्या (Coronary Arteries) आहेत. त्यापैकी उजव्या रक्तवहिनीस या दलांतील ज्ञानतंतूंचा पुरवठा होतो.

(८) Ventricular (व्हेंटिक्युलर):- हृदयाच्या खालच्या खोल्या - ज्यास व्हेंट्रिकल्स असे म्हणतात यावर या ज्ञानतंतूचा ताबा चालतो.

(९) Left Coronary (लेफ्ट करोनरी):- हे दल पुढचे बाजूचे आहे. हृदयास पोषण करणारी अशी डावी रक्तवाहिनी आहे तीस याकडून ज्ञानतंतू जातात.

(१०) Endocardiac (एंडोकार्डिअॅक):- हृदयाचे बाजूचे पातळ आवरण ज्यास एंडोकार्डिअम असे म्हणतात त्यास या दलांतून ज्ञानतंतूंचा पुरवठा होतो.

(११) Remak (रेमॅक):- प्रत्यक्ष हृदयाचे भागांत हे दल आहे. याचा ताबा हृदयाचे स्नायूंवर व त्यायोगे हृदयाचे क्रियांवर चालतो. हे दल बिघडल्यास हृदयाची क्रिया बंद पडेल.

(१२) Bidders Ganglia (बिडर्स गँग्लिया):- वरीलप्रमाणे हृदयाचे आंतील भागास हे आहे. ज्याप्रमाणे दुहेरी पाकळ्यांचे कमळ असते त्याप्रमाणे हे हृत्कमल आहे. याच्या ह्या दोन आंतील पाकळ्या आहेत. या दलाचा ताबा हृदयावर चालतो. हे दल बिघडल्यास हृदयाची क्रिया फार जलद चालते.

वरील वर्णनावरून असे सहज दिसून येईल की ह्या चक्राने हृदय अंतर्बाह्य व्यापून टाकिले आहे! या चक्राचा ताबा हृदय व फुप्फुस या छातीतील अत्यंत महत्त्वाचे अवयवांवर व त्यांचे आवरणावर चालतो. यांची क्रिया बंद पडणे अगर सुरू होणे

ह्या गोष्टी ह्या चक्रावर अवलंबून आहेत. या ज्ञानचक्रातील ज्ञानतंतूंचे इंद्रियविज्ञान शास्त्रामध्ये फार महत्त्वाचे वर्णन केले आहे. या चक्रावर ताबा मिळविणे जरूर आहे.

थेट मेंदूपासून निघालेल्या Vegas (व्हेगस) नांवाच्या अत्यंत महत्त्वाच्या ज्ञानतंतूबरोबर या चक्रांतून ज्ञानतंतू गेले आहेत. यावरून ह्याचे महत्त्व कळून येईल. अशा या अत्यंत महत्त्वाचे चक्रावर ताबा मिळवणे जरूर नाही काय?

आपल्या शास्त्रानुसार याचे काय वर्णन आहे ते आता पाहूं :-

अनाहत हे चवथे मोठे ज्ञानचक्र आहे. हे हृदयाचे ठिकाणी असल्यामुळे ह्यास हृत्कमल असे नाव आहे. हे द्वादशदलांकित आहे.

**द्वादशारं महाचक्रं हृदये चाप्यनाहतम्॥**

**- योगशिखा ५:९**

असे योगशिखा, योगचूडामणि, ध्यानबिंदु वगैरे उपनिषदांत म्हटले आहे. या कमलास बारा पाकळ्या आहेत. या प्रत्येक पाकळीत अनुक्रमे 'क' पासून 'ठ' पर्यंत - क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ,- वर्ण आहेत. ह्या मातृका किंवा ही बीजे होत. प्राणवायु येथे राहतो. श्वासोच्छ्वासाची क्रिया व शरीरात चैतन्य - प्राण राखणे ह्या क्रिया ह्या वायूच्या होत.

व्यावहारिक दृष्ट्या प्राणवायु हाच मुख्य मालक असल्यामुळे मनुष्य स्वाभाविकपणे माझा प्राण असे जेव्हां शब्द उच्चारतो तेव्हां तो हृदयास बोट अगर हात लावून दाखवितो! मनाचेही वास्तव्य ह्याचे शेजारीच आहे. ज्यावेळी मणिपूर चक्रावरून

मूळ वायु वर येत जातो तेव्हां ह्या हृत्कमलावर त्याचे प्राण व मन असे स्पष्ट दोन विभाग झालेले दृष्टोत्पत्तीस येतात म्हणून ह्या कमलाचे ठिकाणी प्राण व मन यांचा निरोध करून त्यांचा लय करावा असे अमृतबिंदु, मैत्रायणीय उपनिषदांत सांगितले आहे.

**तावदेव निरोद्धव्यं यावत् हृदि गत क्षयम्।**

**एतज्ज्ञानं च ध्यान च शेशो न्यायश्च विस्तर:।।**

**- अमृतबिंदु ५**

**- मैत्रायणीय ६:३४**

अर्थ :- हृदयस्थ साक्षीरूप जो आत्मा त्याचे ठिकाणी संपूर्ण लय होईपर्यंत मनाचा रोध करावा. हेच ज्ञान व हाच मोक्ष! ह्यावरून बाकी सर्व ग्रंथविस्तार होय.

उपवायूंपैकी देवदत्त या नांवाचा वायु येथे राहतो. ह्याचे कार्य जांभई येणे, निद्रादि कर्मे करणे असे आहे. पश्यंति वाणीचे हे स्थान आहे. मनांतले मनांत स्पष्ट उच्चार आपणांस करता येतो ती पश्यंति वाणी होय. हिची स्पष्ट जाणीव आपणांस होते. या वाणीने जप करावा व तोच जप श्रेष्ठ होय असे शास्त्रांत सांगितले आहे. नाभिकमलावर श्रीविष्णूचे दर्शन घेतल्यावर या कमलावर महेशाचे दर्शन होणे क्रमप्राप्तच आहे. श्रीशंकर हा हिमाचलवासी असल्यामुळे त्याचे निवासस्थानाचे शुक्ल रूपांत वर्णन असणे साहजिकच आहे, सप्तपुरींपैकी मथुरा ही नगरी येथे आहे असे मानिले आहे. तसेच सप्तवारांपैकी शुक्रवार - हे अत्यंत तेजस्वितेचे लक्षण आहे - येथे समजला जातो. ह्या कमलाचे प्रत्येक पाकळींत एक एक शक्ति व एक एक आनंद

मानिला आहे. अशा प्रकारे १२ शक्ति येथे वास्तव्य करीत आहेत व द्वादश प्रकारच्या आनंदाचा येथे उपभोग मिळतो. या शक्तींची व आनंदांची नांवे कोष्टकांत पहावीत. येथे स्वरूपता ही मुक्ति समजली जाते.



*Cervical Plexus*

## ५ विशुद्ध-चक्र दलें १६



## प्रकरण ६ वे

# विशुद्ध चक्र - Cervical Plexus

**कंठकूपे विशुद्धयाख्यं यच्चक्रं षोडशारम्।**
**पीठं जालंधरं नाम तिष्ठत्यत्र सुरेश्वर।।**

**- योगशिखोपनिषद् १-१७४**

सप्त ज्ञानचक्रांपैकी कंठस्थित पाचवे विशुद्ध चक्र अत्यंत महत्त्वाचे आहे. मणिपूर व अनाहत चक्राचे भेदन करून प्राण कंठाचे ठिकाणी या चक्रावर येतो. नंतर तेथून आज्ञाचक्रावर जाऊन मग शेवटी सहस्रदलकमलांत जातो असे क्षुरिकोपनिषदांत सांगितले आहे.

**तद्भित्वा कंठमायाति तन्नाडी पूरयोदिति।**

**- क्षुरिकोपनिषद् ११**

टीका :- तत् हृदयपंकजं भित्वा कंठम् तद्गत विशुद्धिचक्र याति। ततो भ्रूमध्यं आज्ञाचक्र ततः सहस्रारचक्रंच।

ध्यानधारणादि मनोलयाचे अभ्यास राजयोगानुरूप जे करीत असतील त्यांचा प्राण, या विशुद्ध चक्रावरून जातो. पण हटयोगाचा जे अभ्यास करीत असतील त्यांचा प्राण पश्चिम मार्गाने वर जातो. कंठामध्ये जालंधर बंध करावा व प्राण पश्चिम मार्गाने वर न्यावा. श्रीहाट, गोल्हाट, वेणुगुंफा वगैरे मार्गाने आज्ञाचक्रावर तो आणावा. यावरून असे दिसून येईल कीं हटयोग व राजयोग यामध्ये प्राणाची गति या चक्रापासून भिन्न

होते. कोणत्याही पद्धतीने गेले तरी आज्ञाचक्रावर यावे लागते व तेथून लगेच सहस्रदलकमलांत प्रवेश करावयाचा असतो.

पुढे दिलेल्या वर्णनावरून असे दिसून येईल की, या चक्रांचा ताबा पंच ज्ञानेंद्रियांवर ब इतर महत्त्वाचे अवयवांवर चालतो. कंठामध्ये असणाऱ्या सर्व रक्तवाहिन्यांवर तसेच श्वासनलिका, अन्ननलिका, तोंड, जिव्हा, दांत, तालु, डोळे, थायरॉइड वगैरे अत्यंत महत्त्वाच्या अवयवांच्या क्रियेवर याचा ताबा चालतो. या चक्रापासून फुप्फुसे, हृदय, व घसा यांकडेही कांही ज्ञानतंतू गेले आहेत हे लक्षांत घ्यावे. आपल्या घशांत सात द्वारे येऊन मिळाली आहेत म्हणून यास सप्तपथ असे म्हणतात. यास इंग्रजींत Pharynx (फॅरिंग्ज) असे म्हणतात. याचे महत्त्व फार आहे. आपल्या जिभेचा खालचा व मागील भाग जेथे खाली चिकटलेला आहे तेथे थोडेथोडे कापावयाचे व जिभेचा शेंडा हातांत धरून जीभ हळूहळू पुढे मागे व बाजूस ओढावयाची म्हणजे ती लांब होते. ह्या क्रियेस लंबिकायोग म्हणतात. हा योग कित्येक वर्षांनी साध्य होतो. तो साध्य झाला म्हणजे जीभ उलटी करून ती घशांत घालावयाची म्हणजे घशांतील नाक कानादि सात द्वारे बंद होतात. यास हटयोगांत खेचरी मुद्रा म्हणतात. ही खेचरी मुद्रा साध्य झाल्यावर व कंठाचे ठिकाणी जालंधर बंध बांधल्यावर प्राणास विशिष्ट मार्गानेच म्हणजे पश्चिम मार्गानेच जाणे भाग पडते. तसा तो गेला म्हणजे मग तो आज्ञाचक्रावर येतो, नंतर सहस्रदलकमलांत प्रवेश करितो व समाधि साध्य करून देतो! अशा महत्त्वाचे चक्रावर ताबा

मिळविता आला म्हणजे जवळजवळ सर्व शिरांचे व्यापारावर व मानेचे वरचे भागावर ताबा मिळवितां येतो असे दिसून येईल.

श्रीमद्भागवत स्कंद २ अध्याय २ मध्ये चक्रभेदन कसे करावे ते सांगितले आहे. भागवतकार म्हणतात, नाभिस्थानांतील मणिपूर चक्रात आलेल्या त्या वायूला हृदयांतील अनाहत चक्रावर न्यावे. तेथून उदान वायूच्या मार्गाने उरस्थलाजवळील विशुद्ध चक्रांत नेऊन तेथून पुढे मोठ्या सावधपणाने चढवीत हळूहळू आपल्या टाळूच्या मुळाशी न्यावे.

खेचरी मुद्रा व तिजपासून होणारी प्राप्ति ह्यासंबंधी ते पुढे म्हणतात, राजा! विशुद्ध चक्रापर्यंत वायूला चढविल्यावर, प्राणाची सात द्वारे बंद करून त्याला भुवयांच्या मध्यभागी न्यावे, येथे आज्ञाचक्र आहे. तेथे अर्धा मुहूर्तपर्यंत तो निश्चल राहिला म्हणजे अकुंठित असे ज्ञान प्राप्त होते! वेदांत, योग व वैद्यकशास्त्रप्रमाणे पाहिले म्हणजे इतर ज्ञानचक्रांप्रमाणे षट्चक्रांतील या विशुद्ध चक्राचे सर्वत्र एकच वर्णन पहावयास सापडते. त्याचे स्थान, वर्ण, पाकळ्यांची व Plexuses ची संख्या व क्रिया इतके बारकाईने पाहिले म्हणजे सर्वांचे ऐक्य आहे असे दिसून येते.

आपल्या शास्त्रानुसार याचे वर्णन काय केले आहे ते प्रथम पाहूं. विशुद्ध हे ज्ञानचक्रांपैकी पांचवे चक्र आहे. याचा धूम्रवर्ण आहे. कित्येक ह्या कमलाचा स्फटिक वर्ण आहे असे मानितात. कंठ हे याचे स्थान आहे. हे कमळ षोडश दलांकित आहे. याला सोळा पाकळ्या ऊर्फ दले आहेत.

**षोडशारं विशुद्धाख्यम्॥**

**– योगचूडामण्युपनिषद् : ५**

या प्रत्येक पाकळीत एक एक स्वर कल्पिला आहे. अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, लृ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः व हे सोळा स्वर ह्या कमळाचे एक एक दलांत अधिष्ठित आहेत. या प्रत्येकास मातृका असे म्हणतात. हीच मूळ बीजे होत. या चक्राचे ठिकाणी प्राण २ घटिका ४६ पळापर्यंत नित्य वास्तव्य करतो. येथे १००० अजपाजप नित्य होतो. जीवात्मा हे याचे दैवत कल्पिले आहे. तेज हे तत्त्व तेथे वास्तव्य करते.

पंचप्राणांपैकी उदान वायूच्या भ्रमणाचे हे स्थान होय. बोलणे, इच्छा, उत्साह, बल, वर्ण, व स्मृति या क्रिया तो करतो. उपवायूंपैकी कूर्म या नावाचा वायु तेथे राहतो. त्याचे कार्य म्हणजे डोळ्यांची उघडझाप करणे हे होय. चारी वाणींपैकी मध्यमा वाणीचे हे स्थान आहे. तोंडातले तोंडात जप येथे होतो. सप्तपुरींपैकी श्रीकृष्णाचे वास्तव्यस्थान जी द्वारकानगरी तीच ही होय असे मानिले आहे. तसेच सरूपता ह्या मुक्तीचे हे ठिकाण होय.

ह्या चक्राच्या प्रत्येक दलांत एक एक शक्ति वास्तव्य करीत आहे व प्रत्येक दलाचे ठिकाणी एक एक आनंदाचा भोग मिळत असतो. या शक्ति कोणत्या व हे आनंद कोणकोणते आहेत ह्याची माहिती कोष्टकांत दिली आहे ती पहावी.

## स्थान - Position

शरीरशास्त्राप्रमाणे विचार केल्यास सप्तज्ञानचक्रांपैकी विशुद्ध चक्रास सिंपथॅटिक नर्व्हस सिस्टिमपैकी Cervical Plexus (सर्व्हायकल प्लेक्सस) असे म्हणण्यास हरकत नाही. ज्याप्रमाणे बटमोगरा, चमेली वगैरे कित्येक फुले, पाकळ्यांच्या दोन दोन अगर तीन तीन घेरांची असतात, त्याप्रमाणे हे कमल पाकळ्यांच्या दोन दोन अगर तीन तीन घेरांचे आहे. पहिल्या मोठ्या घेरांचा रंग धूम्र वर्णाचा (Reddish Grey) आहे व बाकीचे शुभ्र वर्णाचे आहेत. हे कंठाचे ठिकाणी म्हणजे मानेमध्ये ज्या मोठ्या Carotid (कॅरॉटिड) नांवाच्या रोहिण्या (Artaries) आहेत व इतर नीला (Veins) आहेत त्यांस, तसेच घशांतील सप्तपथ, श्वासनलिका आणि थायरॉइड व थायमससारखे अत्यंत महत्त्वाचे अवयव, यांना या चक्रापासून ज्ञानतंतू गेलेले आहेत. त्यावरून याचे महत्त्व किती आहे हे लक्षांत येईल. शारीरिक वैद्यकशास्त्राचे दृष्टीने काय वर्णन आहे ते पाहूं. याची सोळा दले आहेत. त्याचे वर्णनाकडे वळू.

## दले - Plexuses

(१) Superior Cervical (सुपीरिअर सर्व्हायकल):- हे वरच्या अंगचे दल आहे. हे अगदी मऊ आहे. यांतून ज्ञानतंतू डोक्याच्या हाडाच्या कवटीचे भोकांतून मेंदूमध्ये गेले आहेत.

(२) Carotid (कॅरॉटिड प्लेक्सस):- हृदयापासून मुख्य

मोठी शुद्ध रक्तवाहिनी निघते. ती पुढे कमानीसारखी होते व नंतर खाली वाकून छातीत व पोटाचे भागाकडे जाते असे मागे सांगितले आहे. या कमानीसारखे भागास आर्च ऑफ दी एओर्टा असे म्हणतात. यापासून मानेचे दोन्ही बाजूस एक एक अशा मोठ्या दोन रोहिणी - शुद्ध रक्तवाहिन्या निघतात. त्यास कॅरॉटिड आर्टरीज असे म्हणतात. प्रत्येकीचे दोन दोन भाग होतात. एक मेंदूकडे जाते व ती डोक्याच्या कवटीचे भोकांतून शिरते. तीस Internal Carotid (इंटरनल कॅरॉटिड) असे म्हणतात. दुसरी बाहेर असून ती पुढे डोक्याचे वरचे बाजूकडे जाते तिला बाह्य कॅरॉटिड म्हणतात.

हे दल आंतर कॅरॉटिड रोहिणीचे बाहेरचे बाजूस आहे. यांतून डोळे, नाक, जिव्हा वगैरे अवयव व उपरिनिर्दिष्ट रोहिणीकडे ज्ञानतंतू गेले आहेत, त्यामुळे त्या अवयवांवर याचा ताबा चालतो. मेंदूचे आवरणाकडेही यापासून ज्ञानतंतू जातात.

(३) Cavernous Plexus (कॅव्हर्न प्लेक्सस):- हे दल वरचे दलाचे आंतील बाजूस आहे. यापासून तोंड, दात, डोळे, कान वगैरे अवयवांकडे ज्ञानतंतू जातात.

(४) Interior and External (बाह्यदलाचे खालची व बाहेरची):- यापासून मेंदूतून थेट निघणाऱ्या ज्ञानतंतूकडे, पृष्ठवंशातून निघणाऱ्या ज्ञानतंतूकडे, Vegas (व्हेगस) नांवाच्या अत्यंत महत्त्वाचे ज्ञानतंतूकडे, तसेच जिव्हा वगैरे इतर अवयवांकडे ज्ञानतंतू जातात.

(५) Pharungeal (फॅरिंजिअल):- घशांत नाकाची दोन, कानांची दोन, श्वासनलिकेचे एक, अन्ननलिकेचे एक व तोंडाकडचे एक अशी सात भोके एकत्र होतात त्यास फॅरिंक्स (Pharynx) - सप्तपथ असे म्हणतात. या भागाकडे यांतून ज्ञानतंतू जातात. हे दल आंतील बाजूस आहे.

(६) Laryngeal (लॅरिंजिअल):- श्वासनलिकेकडे यांतून ज्ञानतंतू जातात.

(७) Superficial Cardiac (सुपरफिशिअल कार्डिॲक) कॅरॉटिड रोहिणीचे मागे हे दल आहे. यांतून हृदयाकडे, श्वासनलिकेकडे ज्ञानतंतू जातात.

(८) External Carotid (बाह्य कॅरॉटिड):- बाह्य कॅरॉटिड रोहिणीभोवती ह्या दलाचे जाळे आहे. यापासून या रोहिणीकडे, मुखाकडे, कर्णाकडे, तसेच मेंदूतील रोहिणीकडे ज्ञानतंतू गेले आहेत.

(९) Superior & Inferior Middle Cervical (सुपीरिअर अँड इन्फिरिअर मिडल सर्व्हायकल):- यापासून वरच्या व खालच्या दलांत ज्ञानतंतू गेले आहेत.

(१०) External Middle Cervical (एक्स्टर्नल मिडल सर्व्हायकल):- हे अत्यंत सूक्ष्म आहे.

(११) Thyroid (थायरॉइड):- मानेचे पुढचे बाजूस थायरॉइड या नांवाचा अत्यंत महत्त्वाचा पिंड आहे. हा अंत:स्रावी आहे. यकृतापासून ज्याप्रमाणे पित्ताचा स्राव बाहेर येतो त्याप्रमाणे ह्या पिंडापासून कोणताही स्राव बाहेर येत नाही,

तर यांतून जो स्राव होतो तो आतल्या आत रक्तांत लगेच मिसळून जातो. याचा स्राव बंद झाला तर मनुष्याची वाढ खुंटते, डोळे बाहेर आल्यासारखे दिसतात व शरीराची चमत्कारिक वाढ होते. अशा अत्यंत महत्त्वाचे अवयवाकडे यांतून ज्ञानतंतू गेलेले आहेत.

(१२) Middle Cardiac (मध्य कार्डिॲक):- हे थोडे मोठे दल आहे. यांतून हृदयाकडे ज्ञानतंतू जातात.

(१३) Superior & Inferior Cervical (सुपीरिअर अँड इन्फिरिअर सर्व्हायकल):- हे मानेतील पहिल्या फासळीचे समांतर रेषेत मणक्याचे पुढचे बाजूस आहे. यांतून मध्य घेरांतील दलाकडे ज्ञानतंतू जातात.

(१४) Inferior or Subclavian ( इन्फिरिअर ऑर सबक्लेव्हिअन):- महास्रोतसाचे कमानीचे भागापासून सबक्लेव्हिअन नांवाची रोहिणी निघते. ती मानेतून हाताकडे जाते. या रोहिणीचे उगमाजवळच हे दल आहे. यांतून या रोहिणीकडे ज्ञानतंतू गेले आहेत.

(१५) Inferior Cardiac (इन्फिरिअर कार्डिॲक):- यांतून हृदयाकडे व श्वासनलिकेकडे ज्ञानतंतू गेले आहेत.

(१६) External or Vertebra (एक्स्टर्नल ऑर व्हर्टिब्रा):- मणक्याकडे जाणारी व्हर्टिब्रा नांवाची रोहिणी आहे. तिचे भोवती हे दल आहे. यांतून सदर रोहिणीकडे तसेच मेंदूकडे जाणाऱ्या रोहिण्यांकडे ज्ञानतंतू गेले आहेत.

या चक्राच्या पहिल्या मोठ्या घेरांतील दलांमधून कांही ज्ञानतंतू आंतर कॅरॉटिड रोहिणीबरोबर मेंदूत शिरले आहेत. ते मेंदूतील रोहिण्यांभोवती व डोळ्यांकडे जाणाऱ्या रोहिण्यांभोवती ज्ञानतंतूंची जाळी अगर लहान दलेच बनवितात. मेंदूचे आंतील आवरण ज्यास Pia matter (पाया मॅटर) म्हणतात, त्याजकडेही यांतील ज्ञानतंतू जातात. तसेच डोळ्याच्या आंतील भागांतील रेटायना म्हणून जो ज्ञानतंतूचा पडदा आहे की, ज्याच्यावर सर्व बाह्यसृष्टींतील प्रतिबिंबे उमटतात, त्याकडे जाणाऱ्या रोहिणीकडे यांतून ज्ञानतंतू गेले आहेत.

ह्या तिहेरी घेराच्या कमळाच्या बाह्य घेराची दले अगर पाकळ्या मोठ्या आहेत. आंतील मधला घेर अगदी लहान आहे व त्याचे आंतील घेर मध्यम प्रतीचा आहे.





Optic Thalamas
६ आज्ञा-चक्र दलें २
Brain
Eye Ball
Optic Nerve
Optic Thalamas
Optic Tract
हं
क्षं
क्र
शी
रवि
वार
भ्रूमध्य

## प्रकरण ७ वे

## आज्ञाचक्र - Optic Thalamus

**आज्ञानाम भ्रुवोर्मध्ये द्विदलं चक्रमुत्तमम्।**

**- योगशिखोनिषद् १:१७५**

षट्चक्रांपैकी 'आज्ञा ऊर्फ अग्निचक्र' हे शेवटचे म्हणजे सहावे ज्ञानचक्र आहे. हे द्विदलांकित असल्यामुळे यास द्विदल कमल असे म्हणतात. हे शेवटचे चक्र अत्यंत महत्त्वाचे आहे, हे पुढील विवेचनावरून कळून येईल. येथे आत्म्याचा साक्षात्कार होतो तसा नादब्रह्माचाही साक्षात्कार होतो! येथे स्वस्वरूपाचे ज्ञान प्रात होते.

### स्थान - Position

हे चक्र भ्रूमध्याचे ठिकाणी आहे. येथे भ्रूमध्य म्हणजे दोन भुवयांचेमधील कातड्याचा भाग अगर हाडाचा भाग असा अर्थ घेऊ नये. तर शाखाचंद्रन्यायाने भ्रूमध्य बिंदूचे समांतर असे मस्तकांत असलेले मेंदूतील स्थान, याने लक्षित आहे असा अर्थ घ्यावा. उपनिषदांत हाच अर्थ अभिप्रेत आहे असे खाली दिलेल्या उपनिषद् वचनावरून कळून येईल.

**आज्ञा चक्रं च मस्तकम्।।**

**- योगकुंडल्युपनिषद् ३:११**

आज्ञाचक्र हे मस्तकांत मेंदू आहे. मेंदूचे मुख्य दोन भाग आहेत. तेथे हे अग्निचक्र आहे.

विशुद्ध चक्रावरून प्राण या द्विदल कमलावर येतो. कंठस्थित विशुद्ध चक्रापासून कांही ज्ञानतंतू मस्तकाचे कवटीचे भोकातून शिरून मेंदूकडे जातात असे मागे शरीरशास्त्रानुसार विशुद्ध चक्राचे वर्णन केले आहे त्यावरून दिसून येईल. त्या चक्रांतील कांही ज्ञानंततू डोळ्यांच्या ज्ञानतंतूकडे गेले आहेत. जगांतील बाह्य वस्तूंचे प्रतिबिंब डोळ्यांतील ज्ञानतंतूचे पडद्यावर - Retina (रेटिनावर) - पडते. तेथून नेत्राकडे येणाऱ्या ज्ञानतंतूचे मार्गाने ते मेंदूकडे जाते व मग आपणांस त्या वस्तूचे ज्ञान होते. नेत्राकडे येणारे ज्ञानतंतू मोठे आहेत. त्यास Optic Nerves (ऑप्टिक नर्व्हस) म्हणतात. दोन्ही नेत्रांचे ज्ञानतंतू मेंदूचे मध्यभागी आज्ञाचक्रावर एकत्र होतात. त्यास Optic Chiasm म्हणतात. या ठिकाणी काही ज्ञानतंतू एकमेकांत मिसळून विरुद्ध बाजूकडे जातात व काही सरळ मेंदूचे भागाकडे जातात. भ्रूमध्य दृष्टियोगाने नेत्रांच्या ज्ञानतंतूच्या मार्गाने आज्ञाचक्रावर ताबा मिळवितां येतो हे दिसून येईल. शरीरशास्त्रदृष्ट्या आज्ञाचक्राचे विवेचन पुढे केले आहे, त्यावरून या चक्राचे महत्त्व कळून येईल. या चक्रावर ताबा मिळवितां आला म्हणजे सर्व शरीराचे एकंदर व्यापारावर कसा ताबा मिळवितां येतो हे लक्षात येईल.

## दले - Plexuses

शारीरिक वैद्यकशास्त्राप्रमाणे याचे वर्णन कसे केले आहे ते आता पाहूं. षट्चक्रांपैकी आज्ञाचक्रास मस्तकांतील मेंदूचे भागांपैकी Optic Thalamus (ऑप्टिक थॅलॅमस) असे

म्हणण्यास हरकत नाही. आपला मेंदू मस्तकाच्या हाडांचे पोकळीत आहे. मेंदूचे मधोमध असे दोन भाग आहेत. त्यास अर्धगोल म्हणतात. हे दोन्ही भाग मध्यावर जोडलेले आहेत. मेंदूमध्ये कांही ठिकाणी पोकळ्या आहेत त्यांत जीवन भरलेले आहे. अशा पोकळ्यांस Ventricles (व्हेंट्रिकल्स) म्हणतात. अशापैकी तिसरी पोकळी Third Ventricle (थर्ड व्हेंट्रिकल) ज्यास म्हणतात तो भाग मेंदूचे दोन्ही अर्धगोलांचे मध्यावर आहे. या पोकळीचे दोन्ही बाजूस लांबट आकाराचे मज्जातंतूंचे दोन भाग आहेत. त्यास 'ऑप्टिक थॅलॅमाय' असे म्हणतात. हीच आज्ञाचक्राची दोन दले होत! हे भाग - ही दले नीलवर्ण मज्जातंतूंची - Grey Matter (ग्रे मॅटर) - बनली आहेत व त्यावर पांढऱ्या मज्जातंतूंचे - White Matter (व्हाईट मॅटरचे) - पातळ आवरण आहे. दलांचे खालील भाग मेंदूस चिकटलेले आहेत. त्याचे बाहेरचे बाजूस मेंदूतील Internal Capsule (इंटर्नल कॅप्सूल) म्हणून महत्त्वाचा भाग आहे. या प्रत्येक दलाचा बाहेरचा भाग म्हणजे अर्धगोलांत असलेल्या पोकळीची Lateral Ventricals (लॅटरल व्हेंट्रिकल्सची) एक बाजू होते. या दोन्ही दलांच्या कांही मज्जातंतूंपासून या दलाने मध्यावर असलेल्या Pineal Gland (पीनिअल ग्लँडचा) देठ तयार होतो!

आपल्या 'देहाचा चालक' 'आत्मा' Ego (एगो) असावा,' असे जे कांही लोकांचे म्हणणे आहे तो येथे असावा असे पाश्चात्त्य शास्त्रज्ञांचे मत आहे. आज्ञाचक्राची दोन्ही दले जेथे

मिळतात तेथे हा भाग आहे हे वर सांगितले आहे. आपल्या शास्त्राप्रमाणे पाहिले तरी आज्ञाचक्रांत, 'अजपा गायत्री मंत्रजपाच्या 'ह' कार व 'स' कार ह्या दोन्ही वर्णांमध्ये ॐकार आहे व तोच आत्म्याचा वाचक आहे' असे सांगितले आहे. आज्ञाचक्राचे मागील एकत्र झालेल्या भागांत नेत्राकडे जाणाऱ्या ज्ञानतंतूंचा मार्ग आहे. ऑप्टिक थॅलॅमसचे दोन्ही भाग म्हणजे ज्ञानतंतूचे गड्डेच (Ganglion) आहेत. यांतून ज्ञानतंतू विरुद्ध बाजूचे भागाकडे जातात. या आज्ञाचक्रापासून मेंदूच्या खालील महत्त्वाचे भागाचे ज्ञानतंतू जातात ते असे :-

१ मेंदूचे दोन्ही अर्धगोलकाकडे.

२ नेत्राकडे जाणाऱ्या ज्ञानतंतूकडे.

३ मेंदूच्या अगदी पुढच्या व अगदी मागच्या भागाकडे.

४ मेंदूतील कॉपर्स स्ट्रायेटम या महत्त्वाच्या भागाकडे इत्यादि, इत्यादि शरीराच्या बाह्य भागापासून येणारे संदेश मेंदूतील मुख्य स्थानाकडे (Center) जातात. त्या मार्गातील आज्ञाचक्र हे एक स्टेशनच आहे. ध्वनिवाहकाचे मध्यवर्ती स्टेशनामध्ये ज्याप्रमाणे संदेश घेतले जातात, व नंतर ते त्या त्या मुख्य स्थानाकडे पाठविले जातात, त्याप्रमाणे या आज्ञाचक्राचे ठिकाणी शरीराचे बाह्य भागांतील सर्व संदेश घेतले जातात व नंतर ते पुढे रवाना होतात. तेव्हां या चक्रावर ताबा मिळवितां आला म्हणजे शरीरांतील बहुतेक सर्व व्यापारावर ताबा मिळाल्यासारखे होते हे सहज लक्षांत येईल. तसा ताबा मिळविता आला म्हणजे शरीरांतील कोणतेही स्पंदन करणार

नाही व तिकडे लक्षही जाणार नाही. चित्ताची एकाग्रता त्वरित उत्पन्न होऊन मनोलय प्राप्त होतो. मनाबरोबर प्राणाचाही लय होतोच. असा लय झाला म्हणजे स्वस्वरूप ज्ञान होते.

## प्रकाश व नाद यांचे ऐक्य कसे होते?

ब्रह्माच्या प्रकाशमय रूपाचे दर्शनाबरोबर नादरूपाचाही साक्षात्कार होऊं लागतो. उपनिषदांतही तसा स्पष्ट उल्लेख आहे.

**नादरूपं भ्रुवोनध्ये मनसा मंडलं विदुः॥**

**- योगशिखोपनिषद् १:१७५**

आज्ञाचक्राचे निकटवर्ती असलेल्या थर्ड व्हेंट्रिकलपासून श्रोत्रेंद्रियाकडे जाणारा ज्ञानतंतू - Auditory Nerve (ऑडिटरी नर्व्ह) - निघतो. षाण्मुखीमुद्राभ्यासामध्ये कर्णामध्ये बोटे घातल्यावर जो ध्वनि उत्पन्न होतो त्यावर अनुसंधान ठेवावयाचे असते. म्हणजे हळूहळू श्रोत्रेंद्रियाचे ठिकाणी अतींद्रिय ज्ञान उत्पन्न होते. श्रोत्रेंद्रियाकडे जाणाऱ्या ज्ञानतंतू - Optic Nerve (ऑप्टिक नर्व्ह) वर अशा प्रकारे ताबा मिळविता आला व तद्वारे अतींद्रिय ज्ञानाने अनुहत ध्वनि उत्पन्न होऊं लागला म्हणजे प्राणाची गति ह्या चक्रावर स्थित होते. प्राणाबरोबर मनही लय पावते हे निराळे सांगण्याचे कारण नाही. त्राटकाचे अभ्यासाने नेत्राच्या ज्ञानतंतूचे मार्गाने आज्ञाचक्रावर ताबा मिळवितां येतो व अतींद्रियज्ञानद्वारा प्रकाशरूप ब्रह्माचा साक्षात्कार होतो. त्याचप्रमाणे व त्यावेळी 'षाण्मुखी' मुद्राभ्यासाने ह्या चक्रावर येऊन नादरूप ब्रह्मस्वरूपाचा

साक्षात्कार होतो. याचे कारण वर दर्शित केल्याप्रमाणे शरीरशास्त्रानुसार नेत्र व श्रोत्र या इंद्रियांच्या ज्ञानतंतूंचा उगम अत्यंत निकटवर्ती आहे हे विचारांती ध्यानी येईल. विशुद्ध (सर्व्हायकल प्लेक्सस) चक्रापासून वरून दोन्ही इंद्रियांकडे ज्ञानतंतू गेले आहेत व ते मस्तकाचे कवटीचे छिद्रांतून मेंदूकडे गेलेले आहेत हे मागे सांगितले आहे. यावरून विशुद्ध चक्रापासून आज्ञाचक्रावर येण्यास ज्ञानतंतूचा मार्ग आहे हे दिसून येईल.

आज्ञाचक्राचे आपल्या शास्त्रानुसार वर्णन काय आहे ते आता पाहू.

आज्ञाचक्र हे ज्ञानचक्रांपैकी सहावे चक्र आहे. हे भ्रूमध्याचे ठिकाणी - दोन भुवयांचे मध्यभागी आहे. हे द्विदल चक्र आहे म्हणजे या कमलास दोनच पाकळ्या आहेत.

**भ्रूमध्ये द्विदलं तथा**

**- योगचूडामण्युपनिषद् १:६**

या दोन पाकळ्यांत 'हं' व 'क्षं' ही दोन बीजे आहेत. ही फार भारी बीजे आहेत. या चक्राचे ठिकाणी प्राण नित्य २ घटका व ४७ पळेपर्यंत वास्तव्य करतो. येथे १००० अजपाजप नित्य होती. प्राणवायु येथे भ्रमण करतो. येथे महाकाली व महालक्ष्मी अशा शक्ति वास्तव्य करतात. सहजानंदाचा व नित्यानंदाचा उपभोग येथे मिळतो. शुद्ध सत्त्वगुण येथे मानला आहे. आत्मा हे या चक्राचे दैवत असून त्याचा वर्ण शुभ्र स्फटिकासमान आहे! सप्त वारांपैकी रविवारची येथे कल्पना

आहे व ती योग्यच आहे. कारण आत्मा हा रवितुल्य आहे व हा रवितुल्य आत्मरवि ब्रह्मांडाची 'अकार' मात्रा आहे. येथून पुढे ब्रह्मांडाच्या स्वरूपाचे दर्शनास सुरुवात होते. हे अर्धमात्रेचे स्थान मानले आहे. तुर्या नांवाच्या चवथ्या अवस्थेचे हे ठिकाण होय.

**तुर्यं भ्रूमध्यसंस्थितम्**

**- त्रिशिखोपनिषद्॥**

मोक्षदायक अशा सप्तपुरींपैकी काशी क्षेत्र येथे मानले आहे ते किती यथार्थ आहे पहा. इडा आणि पिंगला नाडी याच कोणी गंगा व यमुना नद्या! या पवित्र नद्या व मध्ये 'गुप्त' सरस्वती नदी म्हणजे सुषुम्ना नाडी; या त्रिवेणी संगमाचे ठिकाणी काशीविश्वेश्वर जो आत्माराम त्याचे दर्शन कां होणार नाही! या ज्योतिर्लिंगाचे ध्यान ज्ञान्यांनी या पुण्यक्षेत्री सतत करावे असे उपनिषदांत सांगितले आहे.

**ज्योतिर्लिंगं भ्रुवोर्मध्ये नित्यं ध्यायेत्सदा यतिः।**

**- ब्रह्मविद्योपनिषद्।**

सदाशिवाचे सतत ध्यानाने सायुज्य मुक्ति सहज मिळते. म्हणून सायुज्यता मुक्तीचे हे ठिकाण मानिले आहे.

जाबालोपनिषदांत या काशी क्षेत्राचे - या वाराणसी क्षेत्राचे - वर्णन आहे. या वाराणसी क्षेत्रास 'अविमुक्त' क्षेत्र म्हणतात. दोन भुवया व नासिकेचे मूल या तिघांचे जे संधिस्थान ते अविमुक्त क्षेत्र होय. याला योगशास्त्रांत 'कूर्च' असे म्हणतात. सप्त पाताल व सप्त स्वर्ग अशी १४ भुवने

आपल्या शरीरांतच आहेत अशी कल्पना केली आहे. नासिका हा स्वर्ग लोक व कपाळ हा परलोक असे उपरिनिर्दिष्ट उपनिषदांत म्हटले आहे. दोन लोकांचा संधि ते अविमुक्त! 'वारणा' आणि 'असी' या दोन नद्यांचे संगमावर हे क्षेत्र आहे म्हणून यास वाराणसी असे म्हणतात. याज्ञवल्क्य ऋषींना अत्रींनी विचारले :- जो हा अनंत व अव्यक्त आत्मा त्याला मी कसा जाणूं?

याज्ञवल्क्य म्हणाले :- जो हा अनंत अव्यक्त आत्मा त्याची अविमुक्तामध्ये उपासना करावी. तो अविमुक्तामध्ये स्थित आहे.

अत्री :- ते अविमुक्त कशांत स्थित आहे?

याज्ञ :- वारणा आणि नासी यांच्यामध्ये स्थित आहे.

अत्री :- वारणा कोणती व नासी कोणती?

याज्ञ :- इंद्रियांनी केलेल्या सर्व दोषांचे वारण करते म्हणून 'वारणा' आणि इंद्रियांनी केलेल्या सर्व पापांचा नाश करते म्हणून 'नासी.'

अत्री :- या अविमुक्ताचे स्थान कोणते?

याज्ञ :- भुवया आणि प्राण यांचा जो संधि ते याचे स्थान हा स्वर्ग लोक व परलोक यांचा संधि होय. ब्रह्मवेत्ते या संधीची संध्या म्हणून उपासना करतात. या अविमुक्ताची उपासना करावी. हे अविमुक्त क्षेत्र जो यात्त्चप्रकारे जाणतो तो अविमुक्त ज्ञान शिष्यांना सांगतो!

यावर ताबा मिळवावयाचा म्हणजे त्यास विशिष्ट प्रकारचा अभ्यास करावयास पाहिजे. हटयोगांत त्राटक म्हणून एक

अभ्यास प्रथम सांगितला आहे. कोणत्याही वस्तूकडे डोळ्याचे पाते न लववविता टक लावून एकसारखे पाहणे यास 'त्राटक' म्हणतात. राजयोगांत नासिकाग्र दृष्टियोग म्हणून एक अभ्यास आहे तो श्रीमद्भगवद्गीतेचे सहावे अध्यायांत सांगितला आहे.

**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्॥**

**- श्रीमद्भगवद्गीता ६-१३**

नासिकाग्र म्हणजे प्रथम नाकाचा शेंडा असा अर्थ घ्यावा. यावर दोन्ही डोळ्यांची दृष्टि स्थित झाली म्हणजे हळूहळू ती वर चढवीत चढवीत भ्रूमध्याचे ठिकाणी स्थिर करण्यास शिकावे. भ्रूमध्य हेही उलट दृष्टीने नासिकाग्र होते हे लक्षात येईल. भ्रूमध्याचे ठिकाणी दृष्टी स्थिर रहात गेली म्हणजे चित्ताची एकाग्रता होते, पुढे मनोलय होतो व शेवटी आत्मदर्शन होते!

भ्रूमध्य हे अग्निचक्र ऊर्फ आज्ञाचक्र मानले आहे. ह्या ठिकाणी ध्यान धरल्याने अंगुष्ठमात्र आत्म्याचा साक्षात्कार होतो.

**चक्षूंचे देखणे सरे। ज्ञानदृष्टी पाहोनि विरे॥**
**देखणेपणेवीण उरे। सर्वांग देखणा॥ - रामदास**

भ्रूमध्याच्या ठिकाणी अनुसंधान ठेवीत गेल्यास पुढे पुढे असा अनुभव येईल की, आपले श्वासोच्छ्वास अगदी हळूहळू चालत आहेत. असे होणे साहजिकच व क्रमप्राप्त आहे. कारण मनाचा जसजसा लय होत जाईल तसतसा प्राणाचाही लय होत जाईल. मन व प्राण ह्या एकाच वायूच्या द्विधा वृत्ति आहेत. अशा अभ्यासाने चित्ताची एकाग्रता होत जाते व अंत:करणास

समाधान प्राप्त होते. जसजसा अभ्यास होईल व लय होत जाईल तसतसे अतींद्रिय ज्ञान प्राप्त होत जाते. कर्णामध्ये नाद ऐकूं येण्यास प्रारंभ होतो किंवा दृष्टिपुढे निरनिराळे प्रकाश दिसू लागतात! चत्वार देहाचे निरसनानंतर अणु ब्रह्मापासून प्राप्त होणारे देवयान पंथावरील अनुभव प्राप्त होतात. अशा प्रकारे स्वस्वरूप दर्शन होते!



# प्रकरण ८ वे

## सप्तचक्र विवरण कोष्टक

षट्चक्रांचे शास्त्रीय दृष्ट्या संपूर्ण विवरण मागील प्रकरणांत झाले आहे. वेदांत व योगशास्त्रदृष्ट्याही खुलासेवार विवरण करण्यांत आले आहे. या प्रकरणांत ते विवरण भरपूर व एके ठिकाणी चटकन् पहावयास मिळावे म्हणून कोष्टकरूपांत देत आहो.

| अ. नं. | चक्रांचे नांव | दलें | बीजें |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मूलाधार | ४ | वं-शं-षं-सं |
| २ | स्वाधिष्ठान | ६ | बं-भं-मं-यं-रं-लं |
| ३ | मणिपूर (नाभिकमल) | १० | डं-ढं-णं-तं-थं-दं-धं नं-पं-फं |
| ४ | अनाहत (हृत्कमल) | १२ | कं-खं-गं-घं-ङं-चं-छं-जं-झं-ञं-टं-ठं |
| ५ | विशुद्ध | १६ | अ-आ-इ-ई-उ-ऊ-ऋ-ॠ-लृ-लृ-ए-ऐ-ओ-औ-अं-अः |
| ६ | आज्ञा (अग्नि) | २ | हं क्षं |
| ७ | सहस्रदल (ब्रह्मरंध्र) | १००० | लं |

| अ. नं. | चक्राचे नांव | स्थान | जप संख्या | घटी पळे | वायु | वाचा |
|---|---|---|---|---|---|---|
| | | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | मूलाधार | शिवण | ६०० | १-४० | अपान | ० |
| २ | स्वाधिष्ठान | लिंग | ६००० | १६-४० | ” | ० |
| ३ | मणिपूर (नाभिकमल) | नाभि | ६००० | १६-४० | समान | परा |
| ४ | अनाहत (हृत्कमल) | हृदय | ६००० | १६-४० | प्राण | पश्यन्ती |
| ५ | विशुद्ध | कंठ | १००० | २-४६ | उदान | मध्यमा |
| ६ | आज्ञा (अग्नि) | भ्रूमध्य | १००० | २-४७ | प्राण | |
| ७ | सहस्रदल (ब्रह्मरंध्र) | मूर्ध्नि | १००० | २-४७ | व्यान | |

| चक्राचे नांव अ. नं. | शक्ति | आनंद |
|---|---|---|
| | १० | ११ |
| १ मूलाधार | १ गुप्ता २ प्रासका<br>२ कराळा ४ विकराळा | १ परमानंद २ सहजानंद<br>३ वीरानंद ४ योगानंद |
| २ स्वाधिष्ठान | १ अव्यंगता २ शारदा<br>३ वाणी ४ अमृता<br>५ पूर्णा ६ रोहिणी | १ प्रशस्त २ कुरंग<br>३ गर्वगत ४ अवज्ञ<br>५ अविश्वास ६ मूर्च्छित |
| ३ मणिपूर | १ सर्वगा २ सोमा<br>३ या ४ भद्रा ५ तक्षिणी<br>६ सौन्दर्या ७ शांतभद्रा<br>८ विशाखा ९ दंशिनी<br>१० रुचिरा | १ सुषुप्त २ वृष्ण<br>३ इच्छा ४ पिशुण ५ सल्लस<br>६ मोह ७ भय ८ द्रोण<br>९ कशाय १० विशाद |

| चक्राचे नांव | शक्ति | आनंद |
|---|---|---|
| अ. न. | १० | ११ |
| ४ अनाहत | १ पद्मनी २ सदर्भा<br>३ रतिप्रिया ४ वैजयंति<br>५ सौभद्रा ६ अत्रिमाया<br>७ कुहवासिनी ८ घोकिनी<br>९ रेखा १० श्रीया<br>११ तरंगिणी १२ तारा | १ त्रैलोक्य २ वित्कर<br>३ प्राण ४ स्वपद<br>५ अंशप्रकाश ६ अनुताप<br>७ कपद ८ चित्तसंमत<br>९ विकल्प १० महद<br>११ विवेक १२ अहंकृत |
| ५ विशुद्ध | १ सर्वतोभद्रा २ प्राणधारिणी<br>३ सप्तद्योतिनी ४ ब्रह्मायणी<br>५ शबरी ६ लोहिता<br>७ यक्षिणी ८ सौभाग्य-<br>दायिका ९ भानुमति<br>१० मदालसा ११ शिखरिणी<br>१२ छया १३ विष्णुप्रिया<br>१४ विश्वोदरा<br>१५ माया १६ चित्रघंटा | १ हुम् २ फट्<br>३ वौषट् ४ स्वाहा<br>५ स्वधा ६ मन<br>७ अमृत ८ गांग<br>९ शुद्ध १० रप<br>११ धर १२ नील<br>१३ धीम १४ प्राण |
| ६ आज्ञा | १ महाकाली<br>२ महालक्ष्मी | १ सहज<br>२ नित्य |
| ७ सहस्रदल | मूलाकृति | निरानंद |

| चक्राचे नांव | देवता | वर्ण | पुरी | वार | मुक्ति |
|---|---|---|---|---|---|
| | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| १ मूलाधार | गजानन | आरक्त | माया | मंगळवार | सलोकता |
| २ स्वाधिष्ठान | ब्रह्मा | पीत | कांची | बुधवार | ,, |
| ३ मणिपूर | विष्णु | नील | अवंती | गुरुवार | समीपता |
| ४ अनाहत | महेश | धवल | मथुरा | शुक्रवार | सरूपता |
| ५ विशुद्ध | जीवात्मा | धूम्र | द्वारका | शनिवार | ,, |
| ६ आज्ञा | आत्मा | शुभ्रस्फटिक | काशी | रविवार | सायुज्यता |
| ७ सहस्रदल | परमात्मा | नानावर्ण | अयोध्या | सोमवार | कैवल्य |

| चक्राचे नांव | मात्रा | देह | अवस्था | अभिमान |
|---|---|---|---|---|
| | १७ | १८ | १९ | २० |
| १ मूलाधार | अ | स्थूल | जागृति | विश्व |
| २ स्वाधिष्ठान | ,, | ,, | ,, | ,, |
| ३ मणिपूर | उ | लिंग | स्वप्न | तेजस |
| ४ अनाहत | म | कारण | सुषुप्ति | प्राज्ञ |
| ५ विशुद्ध | ,, | ,, | ,, | ,, |
| ६ आज्ञा | अर्धमात्रा अमात्रा | महाकारण | तुर्या | प्रत्यगात्मा |
| ७ सहस्रदल | अर्धमात्रा संवित्ति | विज्ञान | उन्मनी | निराभिमान |

| चक्राचे नांव | भोग | गुण | शक्ति |
|---|---|---|---|
| | २१ | २२ | २३ |
| १ मूलाधार | सुखदुःखस्थूल | रजोगुण | क्रिया (इच्छा) |
| २ स्वाधिष्ठान | ,, | ,, | सावित्री |
| ३ मणिपूर | प्रविविक्त | सत्त्व | लक्ष्मी ज्ञान (श्री रमा) पार्वती द्रव्य |
| ४ अनाहत | आनंद | तम | गौरी-इच्छा |
| ५ विशुद्ध | ,, | मूर्तिमंत तम | अव्यक्त-स्वरात्म |
| ६ आज्ञा | आनंदावभास | शुद्ध सत्व | इच्छाशक्ति |
| ७ सहस्रदल | निरानंद | निर्गुण | प्रकाश श्री |

| चक्राचे नांव | तत्त्व | वेद | अग्नि | ऋषि |
|---|---|---|---|---|
| | २४ | २५ | २६ | २७ |
| १ मूलाधार | पृथ्वि | ऋग्वेद | आहवनीय | ईश्वर |
| २ स्वाधिष्ठान | ,, | ,, | ,, | इंद्र |
| ३ मणिपूर | आप | यजुर्वेद | आवसथ्य | अंगिरा |
| ४ अनाहत | | सामवेद | दक्षिणाग्नि | ईश्वर |
| ५ विशुद्ध | तेज | ,, | | अग्नि |
| ६ आज्ञा | वायु | अथर्वण | संवर्तक नित्याग्निहोत्र | ईश्वर |
| ७ सहस्रदल | आकाश | निर्वेद | ज्ञानाग्नि | परब्रह्म |

| चक्राचे नांव | अष्टांगे | उपवायु | मुद्रा |
|---|---|---|---|
| | २८ | २९ | ३० |
| १ मूलाधार | | | ऐं-शुद्ध |
| २ स्वाधिष्ठान | | धनंजय | क्लीं-क्षमा |
| ३ मणिपूर | नाद | कृकल | श्री-विवत |
| ४ अनाहत | बिंदु | देवदत्त | ऐं-विस्तृत |
| ५ विशुद्ध | कला | कूर्म | हं-लिंग |
| ६ आज्ञा | ज्योति-रूप | देवदत्त | क्लीं-मोक्ष |
| ७ सहस्रदल | बिंदु | नाग | परमात्म प्रकाश |

# भाग दुसरा

## प्रकरण ९ वे

## चक्रभेदनाचे उपाय

**यत्परं ब्रह्म सर्वात्मा विश्वस्यायतनं महत्।**
**सूक्ष्मात् सूक्ष्मतरं नित्यं स त्वमेव तत्॥**

**- कैवल्योपनिषद्**

साक्षात्काराचे मार्गावरील महत्त्वाचे पण अत्यंत कठीण वाटणाऱ्या षट्चक्ररूपी दुर्गाचे सूक्ष्म विवरण मागील प्रकरणांतून योगशास्त्र, वैद्यकशास्त्र, मंत्रशास्त्र, वेदांतशास्त्र वगैरे शास्त्रांचे आधारे करण्यांत आले आहे. हा शास्त्रीय व शब्द प्रामाण्याचा विषय असल्यामुळे त्यास स्वतंत्र भाग असे म्हटले आहे. एवढ्याने हा विषय संपत नाही. कारण स्वरूप साक्षात्कार करून घेऊन ब्रह्मपद प्राप्त करून घेण्यास या चक्राचे भेदन करण्याचे उपाय कोणते आहेत, चक्रभेदन कसे करावे, त्या मार्गांत सिद्धि वगैरेची विघ्ने कशी येतात, ती सर्व टाळून परब्रह्मरूपी कसे तादात्म्य प्राप्त करून घ्यावे वगैरे वगैरे विषयांचे विवेचन करणे जरूर आहे. हा अनुभवाचा व अभ्यासाचा विषय असल्यामुळे त्या विषयानुरूप सशास्त्र व पद्धतशीर अभ्यास करीत गेल्यास साक्षात्काराचे मार्गांवरील अनुभव येऊं लागतील व शेवटची अवस्था प्राप्त करून घेता येईल. ज्याच्या त्याच्या

परिस्थितीप्रमाणे नित्य थोडा थोडा प्रयोगादाखल कां होईना अभ्यास करीत गेल्यास प्रथमच अनुभव येऊं लागतील. ते तसे आले म्हणजे विश्वास उत्पन्न होऊन जास्त अनुभव प्राप्त करून घेण्याकडे प्रवृत्ती होईल व जास्त जास्त वेळ अभ्यास होत जाईल. जसा जसा अभ्यास होत जाईल तसतसे जास्त अनुभव येऊन आत्मसाक्षात्कार होईल! पण हे सर्व केले पाहिजे. ''बोलाचाची भात बोलाचीच कढी'' उपयोगी नाही. अनुभव हा ज्याचा त्यासच येणार. सतत नियमाने अभ्यास केल्याशिवाय अनुभव कसे येतील? दृढ निश्चयाने अभ्यास करून आत्मसाक्षात्कार सर्वांनी करून घ्यावा.

आत्मसाक्षात्कार प्राप्त करून घेण्याचे ध्यान, जप, अवस्थालय, वृत्तिनिरंध, षाण्मुखी, मुद्रायोग वगैरे निराळे अभ्यास आम्ही 'प्रणवोपासना' व 'साधुसंतांचा देवयानपंथ ऊर्फ साक्षात्कार योग' या ग्रंथांमधून विस्तृतपणे दिले आहेत. प्रस्तुत ग्रंथांत 'अजपाजपा' बद्दल विस्तृत विवेचन करणार आहो. तसेच कुंडलिनीचे उत्थापन व नादानुसंधान या महत्त्वाचे विषयांचे विवरण स्वतंत्र प्रकरणांत करण्यांत येत आहे.

**यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह।**
**यन्मौनं योगिभिर्गम्यं तद्भजेत्सर्वदा बुधः॥**

**- श्रीमत् शंकराचार्य**

अ-जपा जपाबद्दलची माहिती क्वचित्च कांही लोकांना असेल. 'हे मोठे रहस्य आहे' असे कित्येकांना वाटते तर 'हा विशिष्ट जप आहे व तो सांप्रदायिक आहे' अशी कित्येकांची

भावना आहे. 'हे कांही गौडबंगाल आहे व ते कळणे शक्य नाही' अशीही कित्येकांची समजूत आहे. कोणत्या ना कोणत्या सकारण अगर अकारण, निमित्ताने हा विषय गूढ होऊन बसला आहे. हा विषय फार महत्त्वाचा आहे. प्रत्येक जीवाशी याचा संबंध आहे. ह्याचे यथातथ्य ज्ञान प्राप्त करून घेतले असता मनोलय व प्राणलय सहज साध्य करून घेता येऊन अंती स्वस्वरूप साक्षात्कार प्राप्त करून घेता येतो! सर्व सत्पुरुषांनी याचे फार महत्त्व वर्णन केले आहे व या विषयावर ऊहापोह केला आहे. समर्थ श्रीरामदास स्वामी यांनी आपले दासबोधांत एक स्वतंत्र समास यास दिला आहे. (दासबोध दशक १७ समास ५ पहा) कित्येकांची अशी समजूत आहे की, हा हटयोगाचा विषय आहे. तेव्हां या विषयात सामान्य जनाने पडण्यात अर्थ नाही. पण हा गैरसमज आहे. हटयोगात याचे वर्णन आढळून येते तसे राजयोगांतही याचे वर्णन केलेले दृष्टोत्पत्तीस येते तरी याबद्दल कोणी गैरसमज करून घेऊं नये. या विषयाकडे जिज्ञासू दृष्टीने पाहिले म्हणजे हा विषय सर्वांना सहज कळण्याजोगा आहे. हा कळून घेऊन त्याप्रमाणे नित्य अभ्यास करीत गेल्यास यांतील रहस्य प्रत्यक्ष अनुभवास येत जाईल!

उपासना या दृष्टीनेही याचे फार महत्त्व आहे. कित्येक घरांतील वडील मंडळी, पुरुष व स्त्रिया देखील, सकाळी उठून शौचमुखमार्जन झाल्याबरोबर आचमन करून या जपाचे उदक सोडतांना आपणास पहावयास सापडतात. हा जप आहे. जप

म्हटला की त्यास तंत्रविधी आहे व मंत्र आहे. ह्या जपाचे उदक कसे सोडावयाचे? हा सशास्त्र कसा जपावयाचा? वगैरे गोष्टी माहीत पाहिजेत. नुसते कर्म म्हणून याचे प्रातःकाली उदक सोडणारे पुष्कळ पहावयास सापडतात. त्यांना त्यांतील रहस्य ठाऊक नसल्यामुळे प्रत्येकाचे विधीत फरक दृष्टीस पडतो.

या जपाचे ध्यानाचा श्लोक आहे. तो म्हणण्यांत तर फार चुका झालेल्या आढळतात. तसे होणे साहजिक आहे. कारण आमची सर्व विद्या संस्कृत भाषेमध्ये आहे. ती भाषा अलीकडे फार थोड्यांना कळते. त्यांतून शास्त्रीय परिभाषा असली म्हणजे मग ते फार अवघड होऊन बसते. या जपाच्या ध्यानाचे श्लोकात सर्व रहस्य साठवलेले आहे व याचे वर्णनही त्यांत आहे. तेव्हां हा श्लोक कठीण असणारच. तो म्हणताना व एकापासून दुसऱ्याकडे जाताना पाठभेद कित्येक वेळी अनर्थकारक होतात. उपासनेचे दृष्टीनें मंत्रजपाचे किती महत्त्व आहे हे निराळे सांगण्याची जरूरी नाही. तेव्हां जप सशास्त्र व शुद्ध होईल इकडे लक्ष ठेविले पाहिजे.

## अजपा जप म्हणजे काय?

या सृष्टीमध्ये देहधारी जितका प्राणी आहे, त्या प्रत्येकाचे जीवित प्राणवायूवर अवलंबून आहे असे दिसून येईल. भूपृष्ठावर वावरणाऱ्या प्राण्यांचे जीवित श्वासोच्छ्वासावर अवलंबून आहे असे आपणास प्रत्यही आढळून येईल. जलामध्ये वावरणाऱ्या जलचरांना प्राणवायु घेण्याकरिता

ईश्वरनिर्मित कांही इंद्रिये असतात. भूगर्भामध्ये सापडणाऱ्या प्राण्यांनासुद्धा प्राणवायूची आवश्यकता लागते असे शास्त्रज्ञांचे विचारावरून दिसून येईल. यावरून असे ध्यानी येईल की, जारज, स्वेदज, उद्भिज व अंडजादि चारी खाणीपैकी कोणत्याही खाणीत उत्पन्न झालेला प्राणी असो, त्यास श्वासोच्छ्वासाची जरुरी आहे. श्रीसमर्थ म्हणतात,

**देहधारक जितुका प्राणी। स्वेतजउद्भिजादिक खाणी।।**
**स्वासोस्वास नस्तां प्राणी। कैसे जिती।।**

**- दासबोध १७: ५: १२**

ही श्वासोच्छ्वासाची क्रिया अखंड चालू असते व ह्याचे कमीजास्त प्रमाणावर, स्थैर्यावर, व निरोधावर आयुष्याची मर्यादा अवलंबून असते. मनुष्यप्राण्यापुरताच आपणास विचार कर्तव्य असल्यामुळे मनुष्यप्राण्यांच्या दृष्टीनेच याचा विचार करूं. पाश्चात्त्य शास्त्रज्ञांचे सुद्धा असे मत आहे की, मनुष्याने श्वासोच्छ्वासाचे प्रमाण नियमित केले तर मनुष्याचे आयुष्य खात्रीने वाढलेच पाहिजे.

श्वास नाकाने आंत - फुप्फुसांत - घेणे व तो बाहेर सोडणे या दोन्ही क्रियेस एक श्वासोच्छ्वास (रेस्पिरेशन) म्हणतात. हे दर मिनिटास सुमारे १८ होतात असे वैद्यकशास्त्राचे मत आहे. हे प्रमाण अत्यंत श्रम केल्यावर, फुप्फुसाचे वगैरे विकारांत किंवा भीतीमुळे मनावर परिणाम झाल्याकारणाने वाढते. चित्ताचे समाधान असले म्हणजे हे प्रमाण कमी असते. आपल्या शास्त्राने असे सांगितले आहे की, प्रत्येक जीवाची आयुर्मर्यादा त्याच्या

प्रारब्ध कर्मानुसार कमी जास्त वर्षांची ठरलेली आहे. म्हणजे त्याने जन्माला आल्यापासून मृत्युमुखी पडेपर्यंत ठरावीक संख्येचे श्वासोच्छ्वास घेतले पाहिजेत अशी विधिघटना दिसते. अहोरात्र म्हणजे चोवीस तासांमध्ये मनुष्याचे श्वासोच्छ्वास २१६०० होतात ही संख्या शास्त्रज्ञांनी ठरवून टाकिली आहे. या हिशेबाने पाहता असे दिसून येईल की, एका तासात ९०० श्वासोच्छ्वास होतात व एका मिनिटांत १५ श्वासोच्छ्वास होतात. हे प्रमाण वैद्यकशास्त्राशी जुळते आहे हे ध्यानी येईलच. ही जी श्वास घेण्याची व सोडण्याची म्हणजे उच्छ्वासाची क्रिया, यामध्ये सहजासहजी एक जप होतो असे वेदांत शास्त्राचे व आगमाचे मत आहे. ज्याप्रमाणे कोणत्याही देवतेचे अगर मंत्राचे जप मुद्दाम जपावे लागतात त्याप्रमाणे हा जप मुद्दाम जपण्याचे कारण पडत नाही; तर हा आपोआपच सहजासहजी न जपतांच होतो म्हणून ह्यास अजपा-जप असे म्हणतात.

**हंकारेण बहिर्याति सःकारेण विशेत्पुनः।**
**षट्शतानि दिवारात्रौ सहस्रण्येक विंशतिः।**
**अजपा नाम गायत्री जीवो जपति सर्वदा।**

**- घेरंडसंहिता ५: ८४**

## जपाचा शास्त्रोक्त विधि

या न जपलेल्या जपांत कोणता मंत्र आहे? त्यांत कोणती अक्षरे आहेत? त्याचे रहस्य काय? वर्णाची उत्पत्ति कोठून होते? या जपाचे साफल्य काय? वगैरे विवेचन करण्यापूर्वी या

जपाचा शास्त्रोक्त विधि आम्ही प्रथम खाली देत आहो. ज्यांचे विधि चुकत असतील त्यांनी ते शुद्ध करून म्हणावेत. प्रात:काळी उठल्याबरोबर शौचमुखमार्जन झाल्यावर स्नान करून या जपाचे उदक सोडावे. ज्यांना स्नान करणे अशक्य असेल, किंवा जे अशक्त असतील त्यांनी धर्मशास्त्राने सोय ठेविल्याप्रमाणे शुचिर्भूत होऊन आचमन करून जपाचे उदक सोडावे; अहोरात्र सारखा जप होणारा असल्यामुळे प्रात:काळी उदक सोडण्यापलीकडे कर्म म्हणून यांत जास्त वेळ मोडण्याचे कारण नाही. अनायासाने या कर्ममार्गाचे आचरण कोणी सोडूं नये. यांतील रहस्य जाणून त्याप्रमाणे अभ्यास केला तर स्व-स्वरूप ज्ञान खात्रीने होईल.

'प्रणवोपासना' या ग्रंथामध्ये शास्त्रोक्त जपाचे मंत्रशास्त्राप्रमाणे विस्तृत विवेचन केले आहे. त्यास अनुसरून पुढील हे तंत्रविधि आम्ही देत आहो. अजपा जपाची एक फार जुनी पोथी आमचे पहाण्यांत आली आहे. तिच्यामध्ये यावर भाष्यही केले आहे. जपविधि येणेप्रमाणे आहे.

## अजपा-जप

### १ संकल्प

**आचम्य। प्राणानायम्य। देशकालौ स्मृत्वा। श्रीपरमेश्वर प्रीत्यर्थम्। अद्य सूर्योदयादारभ्य श्वः सूर्योदयपर्यंतम्। उच्छ्वासनिश्वासादि व्यवहाररूपेण षट्शताधिक एक विंशति संख्यांक अजपाजपमहं करिष्ये।**

तथाच हंस गायत्रीसह न्यास ध्यानादि मानसोपचारैः पूजनमहं करिष्ये ।।

२ न्यास :- करन्यास

हं सां ज्ञानात्मने अंगु० ।

हं सीं सूर्यात्मने तर्ज० ।

हं सूं सोमात्मने मध्य० ।

हं सैं निरंजनात्मने अना० ।

हं सौं निराभासात्मने कनि० ।

हं सः सर्वात्मने करतल० ।

एवं हृदयादिन्यासः ।

३ दिग्बंध :- हं० इति दिग्बंधः ।

४ ध्यान :- । आधारे लिंग नाभौ प्रकटित हृदये तालुमूले ललाटे ।

द्वे पत्रे षोडशारे द्विदश दशदले द्वादशार्धे चतुष्के ।

। वासांते ब ल मध्यें ड फ क ठ सहिते कंठदेशे स्वराणाम् ।

। हं क्षं तत्त्वार्थ युक्तं सकलदलयुतं वर्णरूपं नमामि ।।१।।

५ पंचपूजा :- लपृथिव्यात्मने० । इत्यादि०

६ मुद्रा :- ज्यान मुद्रां प्रदर्शयेत् ।

७ जप :- ८ पूर्ववत् कर हृदयादि न्यासश्च ।

९ दिग्विमुख :- सो० इति दिग्विमुखः ।

१० पूर्ववत् ध्यान । ११ पंचपूजा :- १२ मुद्रा :-

१३ जपसमर्पण :- अनेन । तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु ।

एकवीस वेळ तरी जप करावा.

## ध्यानाचा श्लोक

**आधारे लिंग नाभौ प्रकटित हृदये तालुमूले ललाटे।**
**द्वे पत्रे षोडशारे द्विदश दशदले द्वादशार्धे चतुष्के।**
**वासांते ब ल मध्यें ड फ क ठ सहिते कंठदेशे स्वराणाम्।**
**हं क्षं तत्त्वार्थ युक्तं सकलदलयुतं वर्णरूपं नमामि ॥ १ ॥**

या ध्यानाचे श्लोकाच्या अर्थाकडे पाहिल्यास असे दिसून येईल की, पहिल्या ओळीमध्ये मूलाधारादि षट्ज्ञानचक्रांचा उल्लेख आहे.

दुसऱ्या ओळीमध्ये ह्या प्रत्येक चक्रामध्ये किंवा कमळामध्ये किती किती पाकळ्या आहेत ते सांगितले आहे.

तिसऱ्या ओळीमध्ये कोणकोणत्या चक्राच्या दलामध्ये कोणकोणते वर्ण आहेत याचे वर्णन केले आहे.

सरते शेवटी सहस्रदलांमध्ये स्थित असलेल्या प्रकाशरूप परमात्म्यास आत्मिक भावाने प्रणाम केलेला आहे! या श्लोकाचा बरोबर अर्थ एकदम लक्षांत येणार नाही म्हणून त्याचे स्पष्टीकरण पुढे करीत आहो.

## ध्यानाचे श्लोकाचा भावार्थ

मूलाधारचक्र, लिंगाचे ठिकाणी असणारे स्वाधिष्ठान चक्र, नाभीचे ठिकाणी असणारे मणिपूर ऊर्फ नाभिकमल, हृदयाचे ठिकाणी असणारे अनाहत किंवा हृत्कमल, तालुमूलाचे ठिकाणी असणारे विशुद्ध चक्र व ललाटाचे ठिकाणी

भ्रूमध्यामध्ये असणारे अग्निचक्र या षट्‌चक्रांच्या किंवा या षट्‌कमळाच्या पाकळ्या ऊर्फ दले पुढीलप्रमाणे आहेत.

अग्निचक्राच्या दोन पाकळ्या आहेत. विशुद्ध चक्रास सोळा आरे ऊर्फ दले आहेत. हृत्कमलास बारा व नाभिकमलास दहा अशी दले आहेत. स्वाधिष्ठानचक्रास हृत्कमलाच्या बारा दलांच्या निम्मी म्हणजे सहा दले आहेत. मूलाधारास चारच दले आहेत. या कमळांच्या प्रत्येक दलामध्ये पुढीलप्रमाणे वर्ण आहेत ते असे :-

मूलाधार चक्राचे चार पाकळ्यांत व ते स पर्यंत चार वर्ण आहेत. नाभिकमलांत ड ते फ पर्यंत दहा वर्ण असून हृत्कमलामध्ये क ते ठ पर्यंत बारा वर्ण आहेत. कंठाचे ठिकाणी असणाऱ्या विशुद्ध चक्रांत सोळा स्वरांचे वास्तव्य आहे. आज्ञाचक्राचे दोन पाकळ्यांमध्ये हं आणि क्षं ही दोन बीजे आहेत. सहस्रदल नावाच्या सातव्या कमलामध्ये वसत असलेल्या प्रकाशरूप परमात्म्यास, की ज्याच्यापासून सर्व वर्णांची उत्पत्ति आहे, अशा ॐ कारस्वरूपी परब्रह्म यास, मी एकभावाने नमस्कार करतो!

वरील विवेचन सहज ध्यानांत येण्याकरितां तसेच कोणत्या चक्रावर किती जप होतो, प्राण कोणत्या चक्रावर किती वेळ स्थिर राहतो, पंचप्राणापैकी कोण कोठे वास्तव्य करतो, तसेच वाचांचे उगमस्थान कोठकोठून आहे हे लक्षांत येण्याकरितां मागील प्रकरणांत कोष्टके दिली आहेत तिकडे लक्ष द्यावे म्हणजे विषय साकल्याने ध्यानी येईल.

## सोऽहम्

हा जो अनायासाने सहजासहजी जप होत असतो यांत कोणता मंत्र जपला जातो हे आपण पाहू. एकांतामध्ये स्वस्थ चित्ताने बसावे व श्वासोच्छ्‌वासावर लक्ष ठेवावे म्हणजे श्वासोच्छ्‌वासाचे वेळी सोऽहं सोऽहं असे शब्द उमटतात असे प्रत्यक्ष अनुभवास येईल. श्वास आंत घेतांना 'सो' व बाहेर सोडतांना 'हं' अशा तऱ्हेने सोहंचा हा अखंड जप सुरूं असल्याचे ध्यानी येईल.

श्रीसमर्थ म्हणतात -

**एकांती मौन धरून बैसे। सावध पाहाता कैसे भासे।**
**सोहं सोहं ऐसे। शब्द होती।।**
**ऐसी हे अ-जपा सकळासी। परंतु कळे जाणत्यासी।**
**सहज सांडून सायासी। पडोच नये।।**

आपण जागृत अवस्थेत अगर स्वप्नावस्थेत असलो किंवा गाढ निद्रेतही असलो तरी हा जप आपल्यास न कळत पाण्याचे प्रवाहाप्रमाणे एकसारखा सोहं, सोहं, सोहं असा सुरू आहे! या अखंड जपांत सोऽहम् असा जप होत असतो. या मंत्राचे अक्षराकडे पाहिले म्हणजे कळून येईल की, सः व अहं अशी दोन पदे यामध्ये आहेत. यांचा अर्थ असा की तो मी (आहे), वेदांत शास्त्राचे दृष्टीने याचा वाच्यार्थ व लक्ष्यार्थ निरनिराळा आहे. वाच्यार्थ असा की, अज्ञानाच्या उपाधीमध्ये - अविद्येमध्ये - गुरफटलेले आहे असे भासणारे चैतन्य, म्हणजे अर्थात् अहं विशिष्ट बिंदुमात्र जीव, हा मायोपाधिक सर्व

जगावर सत्ता चालविणारा ईश्वर आहे. हा अर्थ घेतला म्हणजे या मंत्रांत जीवा शिवाचे ऐक्य दर्शविले आहे असे दिसून येईल! लक्ष्यार्थाने विचार केला तर असे कळून येईल की, आपले स्वस्वरूप जो अंगुष्ठमात्र आत्मा, तो अखिलव्यापी प्रकाशरूप परमात्मा आहे. या दृष्टीने आत्म्याचे व परमात्म्याचे यांत ऐक्य दर्शविले आहे असे ध्यानी येईल! या जपाचे सकार हे शक्तिबीज आहे व हकार हे पुरुष बीज मानिले आहे असे समजावे. सकार बीज नामरूपात्मक दृश्य जडाचा उद्भव दर्शविते व हकार बीज हे त्यांचा लय दर्शविते. या दोन्ही बीजांच्यायोगे वृत्तीचा उद्भव व लय कळून येतो! या जपासंबंधी कित्येकांनी असे वर्णन केले आहे की, श्वास आंत घेतांना सः म्हणजे तो ईश्वर मी आहे अशी वृत्ति श्वासाबरोबर आत घ्यावी व श्वास बाहेर सोडतांना अहं म्हणजे मी ही अहंकार वृत्ति बाहेर सोडावी. अशा तऱ्हेने देहाच्या अहंकाराचा त्याग करीत जावे व ईश्वर वृत्ति सतत आंत साठवीत जावी म्हणजे कालांतराने आपणच सर्वव्यापी ईश्वर आहोत असा साक्षात्कार होईल! याचा अनुभव अभ्यासाशिवाय मिळणार नाही. हे सहज शब्द आहेत. ही सहज उपासना आहे. समर्थ म्हणतात -

**उच्चारेवीण जे शब्द। ते जाणावे सहज शब्द।**
**प्रत्यया येती परंतु नाद। कांहीच नाहीं॥**
**ते शब्द सांडूनी बैसला।**
**तो मौनी म्हणावा भला॥**

हा जप सर्व प्राणिमात्र करतात. परंतु तो फक्त जाणत्यासच कळतो व त्याचे रहस्य त्यास कळते. या सहज जपाचे रहस्य कळून घेतल्यानंतर इतर कोणत्याही मंत्रजपाचे सायासांत पडण्याचे कारण नाही. इतर जप हे मुद्दाम उच्चार करून करावे लागतात त्यामुळे नाशिवंत आहेत असे म्हणण्यास हरकत नाही. उदाहरणार्थ दगड उत्तम घडविला व मोठ्या सायासाने त्याचा जरी देव बनविला तरी तो केव्हांना केव्हां भंग पावणारच. देव मात्र सर्वव्यापी व सहज आहे. अशा स्थितींत सहज असणाऱ्या देवावर विश्वास ठेवण्याऐवजी नाशिवंत दगडावर कोण विश्वास ठेवील? त्याचप्रमाणे या सहज अ-जपा-जपावर भावना ठेवली म्हणजे सहज देवाची उपासना आपोआप होते, सहज जप होतो, ध्यान घडते, स्तुति होते व ईशस्तवन होते. अशा तऱ्हेने जी सहज सेवा होते तीच सर्वव्यापी ईश्वरास प्रिय होते. म्हणून याच जपाचे रहस्य समजून घेणे व त्याचा अनुभव घेणे हे श्रेष्ठ कर्तव्य होय! आपल्या देहरूपी घरांत सुरू असणाऱ्या या ज्ञानभांडाराचे जर आपण ज्ञान करून घेतले नाही तर निद्रैवी पुरुषाप्रमाणे स्थिति होते. निद्रैव्यास द्रव्याचा साठा तळघरांत असला तरी सांपडत नाही. म्हणून तो दरिद्री राहतो. खाली लक्ष्मी राहते व वर हा दरिद्री वावरतो अशी स्थिति होते! तळघरांत द्रव्याचा साठा, भिंतींत द्रव्याचा साठा, खांबांत व तुळवटांतही द्रव्याचा साठा! अशाप्रकारे सभोवार द्रव्य असून आपण मध्ये कोरडा तो कोरडाच राहतो! अशा परिस्थितीत जो करंटा असतो त्यास अधिक दारिद्र्य येते. ईश्वराची ही काय

अगाध करणी? कित्येक द्रव्य पाहतात तर कित्येक त्याचा उपयोग करतात. हीच प्रवृत्ति व निवृत्ति होय! म्हणून या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन अंतरीच्या नारायणाची ओळख करून घ्यावी!

या मंत्र जपास माळेचे कारण नाही व मोजदादीचेही कारण नाही. ईश्वरानेच प्रत्येक दिवशी २१६०० इतका हा जप होतो असे अगोदरच ठरवून टाकले आहे. आपण जर काय करावयाचे असेल तर ते एवढेच की, या जपाकडे अनुसंधान वृत्ति ठेवावयाची. सकाम कर्म चित्तशुद्धीस कारण असते. चित्तशुद्धीकरतां म्हणून का होईना या सहजासहजी होणाऱ्या मंत्रजपाचे फल, प्रत्येक स्त्री-पुरुषाने आम्ही वर उद्धृत केलेल्या शास्त्रोक्त जपविधीचे, दररोज प्रातःकाळी सूर्योदयाबरोबर उदक सोडून पदरात कां पाडून घेऊं नये?



## प्रकरण १० वे

# चक्रभेदन व साक्षात्कार

हकारेण बहिर्याति। सकारेण विशेत्पुनः।।
हंसहंसेत्यमुं मंत्रम्। जीवो जपति सर्वदा।।
षट्शतानि दिवारात्रौ। सहस्राण्येक विशंतिः।।
एतत्संख्यान्वितं मंत्रम्। जीवो जपति सर्वदा।।
आजपानाम गायत्री। योगिनां मोक्षदा सदा।।
अस्याः संकल्पमात्रेण। सर्व पापेः प्रमुच्यते।।
अनाया सादृशं ज्ञानम्। न भूत्रो न भविष्यति।।
कुण्डलिन्यां समुद्भूता।। गायत्री प्राणधारिणी।।
प्राणविद्या महाविद्या। यस्यां वेत्ति स वेदवित्।।

- योगचूडामण्युपनिषद् १: ३१: ३५

- ध्यानबिंदु ६१-६५

चक्रभेदनाचे उपायांपैकी अजपा-जपासंबंधी मंत्र-शास्त्रदृष्ट्या व वेदांतदृष्ट्या तात्त्विक विवेचन मागील प्रकरणी करण्यांत आले आहे. यास अजपागायत्री म्हणतात. हिचे किती महत्त्व आहे हे वरील उपनिषद् वाक्यावरून कळून येईल. या अजपा गायत्रीचा अभ्यास सर्व स्त्रीपुरुषांनी करून पहावा म्हणजे याचा अनुभव येऊ लागेल.

## अभ्यास

श्वासोच्छ्वासाबरोबर करावयाचा हा एक अभ्यास आहे. तो दिवसभर करावयास साधणार नाही. तो ठरावीक वेळेला व एके

ठिकाणी बसूनच करावयास पाहिजे. श्वास नाकाने आंत घेणे व नंतर बाहेर सोडणे या दोन्ही क्रिया मिळून एक श्वासोच्छ्वास होतो. श्वास म्हणजे वायु आंत घेणे व उच्छ्वास म्हणजे वायु बाहेर सोडणे. श्वास हळूहळू आंत घ्यावा. तो तसा घेतांना 'सो' असे मनांतल्या मनांत म्हणावे व श्वास बाहेर सोडताना 'हं' मनांतल्या मनांत म्हणावे. श्वास आत घेणेची क्रिया संपेपर्यंत सो हेच अक्षर दीर्घ एकदाच म्हणावयाचे. त्याचप्रमाणे सोडण्याची क्रिया संपेपर्यंत हं हे अक्षर एकदाच पण दीर्घ म्हणावे. म्हणजे लांब उच्चार करावा. पुन्हा श्वास घेताना सो म्हणावे व बाहेर सोडतांना हं म्हणावे. श्वास घेतांना पुन्हा सो व सोडताना हं. याप्रमाणे सारखा अभ्यास करावा. श्वासोच्छ्वास होताना सो ऽ हं असा जप होतो हे लक्षात येईल. हा जप करावयाचा म्हणजे श्वासोच्छ्वासावर फक्त अनुसंधान ठेवावयाचे. असा अभ्यास करताना प्रथम दम लागल्यासारखे होईल. वाटल्यास थोडा वेळ थांबावे. श्वास मुद्दाम जोरांत आंत घेऊ नये व मुद्दाम बाहेरही सोडू नये. स्वाभाविकपणे जो श्वासोच्छ्वास होतो, तो होतांना वरीलप्रमाणे जप होतो की नाही हे फक्त अनुसंधान ठेवण्याचा अभ्यास करावयास पाहिजे. हा अभ्यास एकांतात बसून करावा. हा अभ्यास करावयाचे वेळी स्वस्तिकासन घालून ताठ बसावे. दोन्ही हात गुडघ्यावर ठेवावे व डोळे मिटून अभ्यास करण्यास सुरुवात करावी. प्रथम १०।१५ मिनिटेच अभ्यास करावा. हा अभ्यास झाल्यानंतर कांही वेळ नुसता सो ऽ हं सो ऽ हं असा जप मनांतल्या मनांत पश्यंति वाणींत - ५०० पासून

१००० पर्यंत करावा. हा जप हृदयाचे ठिकाणी होतो अशी भावना करावी. हा करतांना श्वासोच्छ्वासाकडे लक्ष देण्याचे कारण नाही. ध्यान वाटल्यास करावे अगर जपावरच लक्ष ठेवावे. कसेही करावे.

याप्रमाणे दिवसा अगर रात्रीतून २।३ वेळ, जमेल त्याप्रमाणे अभ्यास करावा. दिवसाच्या इतर वेळी काम करताना सुद्धा मनांतल्या मनांत जप करण्याचे जमलेच तर फार चांगले!

अभ्यासास बसण्यास अगर जप करण्यास देहाची शुचिर्भूतता ठेवावी. हा मानसिक अभ्यास आहे, तेव्हा अंत:करण शुद्ध असले म्हणजे झाले. स्वस्वरूप साक्षात्कार व्हावा अशी तीव्र तळमळ असेल तर देहाच्या इतर कोणत्याही बंधनाकरता अडून राहण्याचे कारण नाही. अभ्यास जमेल त्यावेळी व असेल त्या परिस्थितीत करावा. मनोलय प्राप्त करून घेणे हे ध्येय आहे. हे लक्षांत ठेवावे व तो साध्य करून घ्यावा.

अशाप्रकारे अभ्यास करीत गेल्यास आपले श्वास हळूहळू कमी होऊं लागल्याचा अनुभव येईल. स्वाभाविकपणे आपला श्वास नाकाचे बाहेर १२ अंगुले वाहतो.

**देहद्बहिर्गतो वायुः। स्वभावात् द्वादशांगुलिः॥**

**– घेरंडसंहिता ५-८६**

हे प्रमाण शरीराचे निरनिराळ्या प्रकारचे व्यापारांत कमी जास्त प्रमाणांत होते. ते असे -

गाण्याचे वेळी - १६

जेवणाचे वेळी - २०

चालतांना - २४

झोपेत - ३०

मैथुनप्रसंगी - ३६

व्यायाम करतांना - याहीपेक्षां जास्त होते.

मनोलय जसजसा होत जाईल तसतसा प्राणाचाही लय होईल. वरील अभ्यासाने हे प्रमाण कमी होता होता श्वासोच्छ्वास अजिबात बंद झाल्याचा अनुभव येईल. या अवस्थेस केवल कुंभक साध्य झाला असे म्हणतात. या वेळी श्वास बाहेर सोडण्याची किंवा आत घेण्याची अशा दोन्ही क्रिया बंद पडतात.

**वायुना घटसंबंधे भवेत्केवलकुंभकम्।**

**- घेरंडसंहिता ५-८९**

अशा वेळी प्राण चक्रभेदन करीत जातो, कुंडलिनीचे उत्थापन होते व पुढे स्वस्वरूप साक्षात्कार होतो!

मनोलय साधण्यास वृत्तिविरोध, मात्रालय, नासिकाग्रदृष्टियोग वगैरे बरेच अभ्यास ज्ञानेश्वरीत सांगितले आहेत. मूळ वायूच्या प्राण व मन या दोन वृत्ति आहेत. प्राण किंवा मन या दोहोंतून कोणास तरी एकास जिंकून घेतले म्हणजे आत्म्याचे दर्शन होते. एकाचा लय झाला की दुसऱ्याचा लय होतोच. हटयोगांत प्राणाचा लय प्रथम जबरदस्तीने करावयाचा असतो व त्यास विशिष्ट मार्गानेच न्यावयाचे असते. राजयोगांत परमेश्वराच्या चरणकमलाचे ध्यान करून किंवा जपादि अभ्यासाने चित्ताची आत्यंतिक एकाग्रता संपादन करावयाची म्हणजे मनाचा लय होत जातो. त्यावेळी प्राणाचाही लय आपोआप होत जातो.

**मनो यत्र विलियेत। पवनस्तत्र लीयते॥**

राजयोग अगर हटयोग हा नांवाचा भाग सोडून देऊन नांवास न बुजता एवढे लक्षांत ठेवावें की, संपूर्ण मनोलय झाल्याशिवाय त्याचे अतीत असलेल्या आत्म्याचे दर्शन होणार नाही.

**लयो लय इति प्राहु: कीदृशं लयलक्षणम्**
**अपुनर्वासनोत्थानाल्लयो विषयविस्मृति:॥**

**- हटयोगप्रदीपिका ४-३४**

**षडउर्मी हृदयांत। यांचा अंत पुरवुनी।**
**तुका म्हणे खुंटे आस। तेथे वास करी तो॥**

**- तुकाराम**

**वृत्तिसहित मन बुडे प्रेमडोहीं। नाठविति देहीं देहभाव॥**
**मन हें दर्पण करोनी निश्चळ। पाहे पा केवळ आत्मा स्वये॥**

**- नामदेव**

**तेथे मन पांगुळलें। आपणांस विसरलें॥**
**आपणांस भुलोन गेले। स्वरूप बोधें॥**

**- रामदास**

**मन मुरे मग जें उरे। तें तूं कारे सेविसिना॥**

**- ज्ञानदेव**

येथे मन हे उपलक्षण घ्यावे. स्वस्वरूपज्ञान झाल्यावर मग परमात्म्याचे ज्ञान पुढील ध्यानधारणादि अभ्यासाने होते. हटयोग किंवा राजयोग यांपैकी कोणत्याही मार्गाने गेले तरी साक्षात्काराच्या मार्गांतील अनुभव सारखेच असणार;

कित्येकांस ओळीने अनुभव येतील तर कित्येकांस मधले टप्पे गाळून पुढचे पुढचे एकदम अनुभव येतील एवढेच. ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात या दोन्ही मार्गांचा समन्वय उत्तम प्रकारे केला आहे हा विशेष होय. या अध्यायांत त्यांनी हटयोगाची सर्व आसने किंवा प्राणायामाचे सर्व प्रकार दिले नाहीत हे लक्षांत घेण्याजोगे आहे. प्राणाची गति विशिष्ट मार्गाने कशी होईल व त्यायोगे मनाचा लय कसा होईल येवढ्यापुरताच हटयोगाचा विषय आहे. राजयोगापैकी नासिकाग्रदृष्टियोग, मात्रालय, वृत्ति विरोधाभ्यास व ध्यानधारणादिक मनोलयाचे अभ्यास सांगितले आहेत. प्राण व मनोलयाच्या अभ्यासाच्या मार्गास 'श्रेष्ठ पंथ' 'पंथराज' असे त्यांनी नांव दिले आहे. हा प्रकाशाचा मार्ग आहे. या मार्गाने जो शेवटच्या अवस्थेप्रत जातो तो तद्रूप होतो!

**येणें मार्गें जया जया ठाया जाइजे।**
**तो गाव आपणचि होइजे।।**
**हें सांगो काय सहजें। जाणसी तू।।**

**- ज्ञानेश्वरी**

## बंधत्रय

हटयोगाच्या कोणत्या अभ्यासाने बंधत्रय साधावे व शक्ति चालना कशी करावी ह्या विषयांत आपणास प्रस्तुत शिरावयाचे नसल्याने राजयोगाचे - मनोलयाचे अभ्यासाचे दृष्टीने बंधत्रय कसे आपोआप साधतात व कुंडलिनी उत्थापन कशी होते

ह्याचा विचार करावयाचा आहे. तो सर्वांस कळण्याजोगा आहे. अभ्यासी पुरुषास तर त्याचा अनुभव येईल.

## चक्रभेदन कसे होते

शुचिर्भूत होऊन सिद्धासनावर बसावे व मूलबंध साधावा. गुदद्वार आकुंचन करून प्राण वर खेचणे यास मूलबंध म्हणतात. हा साधला म्हणजे अपान वायूचा खालचा मार्ग बंद पडल्यामुळे तो आंत संकोच पावू लागतो. मूलाधार चक्रावरून प्राण स्वाधिष्ठान चक्रावर येतो व अपान संकोच पावून स्वाधिष्ठान चक्रावर येऊं लागतो. प्राणाचे व अपानाचे ऐक्य होऊ लागण्यास चित्ताची एकाग्रता व्हावी लागते. तशी ती होत गेल्यास मग अपान प्राणांत हळूहळू लीन होऊ लागतो.

राजयोगाने म्हणजे मनोलयाचे कोणत्याही अभ्यासाने चित्ताची एकाग्रता झाली म्हणजे सर्व शरीरांतील प्राणाची गति एकवटून ती एका दिशेने म्हणजे ऊर्ध्व दिशेने वाहू लागते. ध्यानाचा अगर जपाचा अभ्यास करतांना तन्मय-तदाकार वृत्ति होऊ लागली की, श्वास वाहण्याचे हळूहळू बंद पडू लागतात व बेंबीजवळ पोट आत आपोआप खेचले जाते, म्हणजे उड्डीयान बंध आपोआप साधला जातो. यावेळी प्राण स्वाधिष्ठान चक्राचे वरचे काठावर व नाभिकमलाचे तळाचे भागावर असतो.

**स्वाधिष्ठाना वरिचिले काठीं। नाभिस्थाना तळवटीं।**
**बंध पडे किरीटी। वोढियाणा तो।**

**- ज्ञानेश्वरी ६-२१०**

नासिकाग्रदृष्टियोगाचे किंवा भ्रूमध्य दृष्टियोगाचे अभ्यासांत मान वाकून खाली होऊन, हनुवटी छातीवर टेकते म्हणजे जालंधर बंध आपोआप साधतो. एकाग्रता होत जाते तसतसा खाली बंधत्रय साधत जातो. सिद्धासनाखाली मूलबंध, वरील जालंधर व मधला उड्डीयान हे तीनही बंध मनोलयाचे अभ्यासांत आपोआप साधतात! याच अनुभव घेऊन पहावा. हे तीनही बंध साधले म्हणजे प्राण व मन एकमेकांत लय पावू लागतात. त्यावेळी एक प्रकारची शक्ति उत्पन्न होते व ती या षट्चक्राचे मध्य मार्गाने वर जाऊ लागते.

हटयोगाचे अभ्यासांत प्राणायामाने केवल कुंभक साधतात. बंधत्रयाचा अभ्यास करावयाचा असतो. उड्डीयान बंधास फार महत्त्व आहे. उड्डीयान बंध बरोबर साधला म्हणजे कुंडलिनी-उत्थापन त्वरित होते व प्राणाची गति सुषुम्ना पंथात होते.

मणिपूर ऊर्फ नाभिकमलाचे ठिकाणी कुंडलिनी नामक प्राणशक्ति वास्तव्य करते. तिचे उत्थापन झाले म्हणजे प्राण सुषुम्ना पंथाने वर जाऊ लागतो. कुंडलिनीचे वर्णन व शक्ति चालना कशी करावी वगैरे विषय पुढे स्वतंत्र दिला आहे. नाभिकमलावरून प्राण अनाहत चक्रावर येतो. येथे मनाचे वास्तव्य मानिले आहे. येथे मनाचे व प्राणाचे संपूर्ण ऐक्य होते. एक दुसऱ्यांत लीन होतो. या अनाहत चक्राचे भेदन केले म्हणजे वायूचे स्फुरण होऊ लागते व अनाहत ध्वनि उत्पन्न होतो. आघाताशिवाय उत्पन्न झालेले नाद कानांत ऐकू येऊ लागतात म्हणून यास अन्-आहत ध्वनि म्हणतात. यावरूनच

या हृत्कमलास अनाहत चक्र असे नामाभिधान प्राप्त झाले आहे. ह्याचे ठिकाण चिदाकाश महदाकाशाचे ठिकाणी लीन होऊ लागते. पुढे प्राणाची ऊर्ध्वगति कंठस्थित विशुद्ध चक्रावरून आज्ञाचक्रावर चालू असते. या दोन्ही चक्रांचे भेदनांतील अनुभव प्रकाश किंवा नाद या रूपांत येतात. अग्निचक्रावर आत्म्याचे दर्शन होते.

याचे ध्यानाने पुढील मार्ग आक्रमण करता येतो. शेवटी प्राण ब्रह्मरंध्रांत म्हणजे सहस्रदलकमलांत शिरतो. यावेळी ब्रह्मांडाचे चारी देहाचे अनुभव येतात. चिदाकाश व महदाकाश एक होते, आत्मा व परमात्मा यांचे ऐक्य अनुभवास येते व अशाप्रकारे स्वस्वरूपी लीन होता येते.

## कुण्डलिनी

**सशैलवनधात्रीणां यथाधारोऽहिनायकः।**
**सर्वेषां योगतंत्राणां तथाधारो हि कुण्डली॥**
**सुप्ता गुरुप्रसादेन यदा जागर्ति कुण्डली।**
**तदा सर्वाणि पद्मानि भिद्यंते ग्रंथयोऽपिच॥**

**- हटयोगप्रदीपिका ३-१-२**

'कुण्डलिनी' हा शब्द उच्चारतांच हटयोगांतील हे एक गूढ रहस्य आहे, अशी तात्काल कल्पना होते. ही एक गुह्य चमतकृतिजन्य व कल्पनागम्य अशी वस्तु आहे अशी समजूत आहे. हे एक मोठे गूढ होऊन बसले आहे. हे गौडबंगाल काय आहे ते हटयोग्याशिवाय दुसऱ्यास कळणे शक्य नाही असे

वाटते, पण त्या सर्व गोष्टीस इतके भिण्याचे कारण नाही. सर्वांस समजण्याजोगी येवढेच नव्हे तर आकलन करण्याजोगी ही आहे. जरा विचार करावयास पाहिजे एवढेच.

योगशास्त्रांत हिचे पुष्कळ वर्णन केले आहे. हटयोगप्रदीपिका, घेरंडसंहिता, गोरक्षसंहिता वगैरे अर्वाचीन ग्रंथांतून आणि श्रीज्ञानेश्वर महाराज व श्रीमत् प. प. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज यांचेसारख्या महान सत्पुरुषांचे ग्रंथांतून, तसेच योगावरील प्राचीन उपनिषद् ग्रंथांतून हिचे वर्णन पहावयास सापडेल. ज्याप्रमाणे आपण किल्लीने दार उघडतो अगर कडी काढून दार मोकळे करतो, त्याप्रमाणे कुंडलिनीशक्तीच्या योगाने योगी मोक्षद्वार खुले करतो व अमृतत्वास पावतो. इडा ही गंगा नदी व पिंगला ही यमुना नदी या दोहोंच्या मध्ये 'सुषुम्ना' मार्गात कुण्डलिनी आहे! या ठिकाणी अवगाहन केले असता परमपद प्राप्त होते. सिद्धि प्राप्त होतात व तो कालालाही जिंकतो!! जोपर्यंत इंद्रियशुद्धि झाली नाही, कुण्डलिनी जागृत झाली नाही, प्राणाची गति सुषुम्नेत झाली नाही व जोपर्यंत देहांत ही निद्रावस्थेत आहे, तोपर्यंत त्या जीवाचे जीवित्व पशूप्रमाणे आहे. म्हणजे अज्ञानावस्थेचे आहे. गुरुप्रसादाने ही जागृत झाली म्हणजे षट्चक्रभेदन होते व सर्व हृदयग्रंथी तुटतात!

## कुण्डलिनीचे स्वरूप

कुण्डलिनीचे वर्णन ज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या ज्ञानेश्वरी ग्रंथांत अत्यंत रसाळ, काव्यमय व मोठ्या बहारीचे केले आहे.

**नागिणीचें पिलें। कुंकुमें नाहलें।**
**वळण घेऊनी आलें। सेजें जैसें।।**
**तैसी हे कुंडलिनी। मोटकी औटवळणी।**
**अधोमुख सर्पिणी। निदेली असे।।**
**ते कुंडलिनी जगदंबा। जे चैतन्य चक्रवर्तीची शोभा।**
**जया विश्वबीजाचिया कोंभा। साउली केली।।**
**जे शून्यलिंगाची पिंडी। जे परमात्मया शिवाची करंडी।**
**जे प्रणवाची उघडी। जन्मभूमि।।**

वरील ओव्यांच्या शब्दार्थाचा त्याग करून लक्ष्यार्थाकडेच दृष्टि ठेवावयास पाहिजे. तसेच ज्ञानेश्वरीच्या ६ व्या अध्यायांतील हिचेसंबंधी केलेल्या काव्यमय वर्णनांतील श्लेष व उपमादि अलंकार सोडले आणि काव्य व रूपके गाळली; म्हणजे विचारांती या कुंडलिनीचे खरे स्वरूप कळून येईल. कुंडलिनी साडेतीन वेटोळी घालून नागिणीप्रमाणे सुप्त आहे असे वर्णन आहे. याचा सरळ व गर्भितार्थ असा की, हिची ३।। वेटोळी म्हणजे प्रणवाच्या ३।। मात्रा होत! अकार, उकार, मकार व अर्धमात्रा मिळून प्रणवाच्या साडेतीन मात्रा. यांनाच वेटोळी कल्पिली आहेत. ही वेटोळी क्रमाने सुटतात म्हणजे एका एका मात्रेचा लय होत जातो. या मात्रारूप वाचा, देह, अवस्था, वगैरेंचा क्रमवार लय होत जातो. हे अभ्यासी पुरुषास अनुभवांती कळून येईल. ही प्रणवरूप आहे. प्रणव हे ब्रह्माचे मूळ स्फुरण आहे म्हणून ही मूळमाया होय. हिचा लय परब्रह्म स्वरूपांत होतो. अज्ञानाच्यायोगे सर्व वृत्ति स्वभावतः

बाह्योन्मुख असतात, किंवा परमेश्वराने त्या तशा केल्या आहेत असे म्हणण्यास हरकत नाही; कारण कठोपनिषदांत तसे म्हटले आहे. म्हणून कुंडलिनी अधोमुख आहे. अभ्यासाने वृत्ति अंतर्मुख होऊं लागली व ज्ञान होऊं लागले म्हणजे ती ऊर्ध्वमुख होते. कुंडलिनी ही शक्ति आहे. ती प्रत्यक्ष दाखवितां येणार नाही. वीज प्रत्यक्ष दाखवा म्हटले तर वाटेल तेव्हा दाखवितां येणार नाही. तद्वत् कुंडलिनी ही शक्ति शरीरांत प्रत्यक्ष सगुण रूपाने दाखवा म्हटले तर तशी ती दाखवितां येणार नाही. वीज ही घर्षणाने प्रकाशरूपांत प्रगट होते त्याप्रमाणे हटयोग अगर राजयोग यांच्या अभ्यासाने जसजसा मात्रालय होतो तसतशी ही शक्ति प्रकाशरूपाने प्रगट होते!

## सुषुम्ना पंथ

**सुषुम्ना शून्यपदवी ब्रह्मरंध्र महापथः।**
**श्मशानं शांभवी मध्यमार्गश्चेत्येकवाचकाः॥**

**– हटयोगप्रदीपिका ३-४**

सुषुम्ना, शून्यपदवी, ब्रह्मरंध्र, महापंथ, श्मशान, शांभवी, मध्यमार्ग इतकी नावे सुषुम्ना मार्गास आहेत. यावरून याचा बोध उत्तम प्रकारे होतो. कुंडलिनी शक्ति ज्या विशिष्ट मार्गाने नाभिकमलापासून वर सहस्रदल कमलापर्यंत जाते त्यासच सुषम्ना नाडी म्हणतात. ह्यालाच मध्यमार्ग असे सार्थ नामाभिधान दिले आहे. ही शक्ति षट्चक्रांना जोडणाऱ्या ज्ञानतंतूमधून व चक्राचे मध्यांतून वर जाते. तोच हा पंथ होय.

इडा आणि पिंगला या दोन नाड्यांमध्ये सुषुम्ना आहे. प्राणायामाचे अभ्यासाने सुषुम्ना पंथ शुद्ध होतो व मग कुंडलिनीचालनाभ्यास केल्यावर प्राण त्या मार्गाने सहज वर चढूं लागतो. हिचे मुळाशी कुंडलिनी साडेतीन वेटोळी घालून बसली आहे व हिचे मुख तिने रोधून धरले आहे असे वर्णन आहे.

श्री. प. प. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज म्हणतात:-

**डाव्या नासापुटांत। इडा येऊन संपत।।**
**उजव्या नासापुटांत। पिंगला येऊन संपत।।**
**दो मध्ये सुषुम्ना असे। ती ब्रह्मरंध्री संपतसे।**
**तिचे मुळीं कुंडली वसे। साडेतीन वेटोळ्या देऊनी।।**
**मुखाने सुषम्ना मुख धरी। म्हणूनी तिच्या अंतरी।**
**प्राण प्रवेश न करी। म्हणूनी तिला चाळवावी।।**

**- दत्तमहात्म्य - अ. १४ ओ. ५४**

## कुंडलिनी उत्थापन

मनोलयाचे अभ्यासाने एक एक मात्रेचा लय होत जाऊन प्राणाचा व मनाचा लय एकमेकांत जसजसा हळूहळू होऊ लागेल तसतशी एक शक्ति उत्पन्न होते व ती एका मध्यरेषेत उपरिनिर्दिष्ट मार्गाने ऊर्ध्वगतीने वाहू लागते. यासच कुंडलिनी सुषुम्ना पंथांत शिरली, सुषुम्नाचे द्वार उघडले वगैरे शब्दप्रयोग योजितात. यासच कुंडलिनीचे उत्थापन म्हणतात. कुंडलिनीचे उत्थापन पुष्कळ प्रकारे होऊ शकते. हटयोगांत जी प्रक्रिया सांगितली आहे

त्याप्रमाणे प्राणायामाने केवल कुंभक साध्य करून घेतल्यावर शक्तिचालनेचा अभ्यास करून (यास कंदपीडन म्हणतात.) कुंडलिनी उत्थापन करता येते. मनोलयाच्या कोणत्याही अभ्यासाने - राजयोगाने - चित्ताची पूर्ण एकाग्रता झाली - त्रिपुटी नाहीशी झाली म्हणजे कुंडलिनी उत्थापन होते. अत्यंत भक्तीने बेहोष झाल्यावर कुंडलिनीचे उत्थापन होईल. किंवा सद्‌गुरूंनी कृपाही करून मस्तकी वरदहस्त ठेवतांच त्यांचे स्पर्शाने किंवा नुसत्या कृपाकटाक्षाने कुंडलिनीचे उत्थापन होईल!

कुंडलिनी उत्थापनाचे बाबत साधकाने भ्रम होऊ देऊं नये हा इषारा देणे अगत्याचे आहे. पुष्कळांना आपली कुंडलिनी उत्थापन झाली असे वाटते; नुसते पुस्तकांत वाचून कित्येकांना आपणास ती अवस्था प्राप्त झाली आहे असा भ्रम उत्पन्न होतो. कुंडलिनी उत्थापनाचे अनुभव म्हणून 'सर्वांगातून मुंग्या येतात, येथे एक प्रकारचा आनंद होतो, त्यावेळी गुंगी येते व निश्चेष्ट होतो' वगैरे गोष्टी कांही सागंतात व आपण आत्मज्ञानी झालो अशी समजूत करून घेऊन स्वैराचार करू लागतात. ज्याला साक्षात्कार करून घ्यावयाचा आहे त्या साधकाने या भ्रमांत मुळीच पडू नये. कुंडलिनीचे उत्थापन झाले म्हणजे साक्षात्काराचे मार्गावरील अनुभव येऊ लागतात. ते कसे येतात याचे सविस्तर वर्णन आम्ही आमचे साधुसंतांचा देवयान पंथ ऊर्फ साक्षात्कारयोग या ग्रंथात केले आहे ते जिज्ञासूंनी पहावे.

कुंडलिनी उत्थापनाबाबत गैरसमज आहेत ते दूर करून घ्यावेत. कुंडलिनी उत्थापन कोणी मुद्दाम करू नये. त्याने

भयंकर परिणाम होतील व अपाय होईल, ही गुप्त ठेवावी, ही हटयोगाशिवाय जागृत होत नाही, ही आपोआपच जागृत होईपर्यंत वाट पहावी, ही गुरूकडून उत्थापन करून घ्यावी, ते एक गुह्य आहे, कोणास कळणार नाही वगैरे वगैरे भीतिप्रद व गूढ अशा गोष्टी कित्येक सांप्रदायिक व अतींद्रियवादी म्हणविणारे सांगतात. पण त्यांत तथ्य नाही. हटयोगाशिवाय कुंडलिनी जागृत होणार नाही असे नाही हे मागे दर्शविले आहेच. हटयोगांतील प्राणायामाचा व कंदपीडनाचा अभ्यास गुरूपासूनच जाणून घ्यावयास पाहिजे. नुसती पुस्तके वाचून अगर आपल्या मनाने काही क्रिया करून उपयोग नाही, कारण तो अभ्यास व ती विशिष्ट क्रिया चुकली म्हणजे प्राण भलत्या मार्गाने जाईल व विघ्न ओढवेल अगर दुसरे काही वाईट परिणाम शरीरावर होतील. कुंडलिनी शक्ति हळूहळू उत्पन्न होते - जागृत होते. ती केव्हा जागृत होते हे मागे सांगितले आहे. मनोलयाच्या कोणत्याही अभ्यासाने ती जितकी लवकर जागृत होईल तितक चांगले, कारण त्यायोगे स्वस्वरूप ज्ञान प्राप्त होते. तेव्हां ही आपोआप जागृत होण्याची वाट पहात बसणे म्हणजे नशिबावर हवाला देण्यापैकी होईल. सद्गुरुकृपा संपादन करावयास पाहिजे. गुरुकृपेशिवाय विषयत्याग व तत्त्वदर्शन होणार नाही. त्यांच्या कृपेने सहजावस्था प्राप्त होईल!

**दुर्लभो विषयत्यागो दुर्लभं तत्त्वदर्शनम्।**
**दुर्लभा सहजावस्था सद्गुरो:करुणाविणा।।**

**- हटयोगप्रदीपिका ४ : ९**

हे जरी खरे असले तरी, सद्गुरूंची गाठ पडेपर्यंत व ते कृपा करीपर्यंत बुद्धिमान् मनुष्याने आत्मकल्याणार्थ शास्त्राप्रमाणे अंत:करणशुद्धीस साधनीभूत असे सात्त्विक कर्माचरण करून मनोलयाचा अभ्यास करावा व भूमि तयार करून ठेवावी यांत गुह्य कांही नाही. अभ्यास करता करता परमेश्वरी कृपेने ती जागृत झाली तर त्यांत भयंकर असे कांही नाही व अपायही कांही होणार नाही, उलट उपायच होईल. आकस्मिकपणे तिच्या जागृतीचा कोणास अनुभव आल्यास त्याने आपणास धन्य मानून घ्यावे।

## अतींद्रिय ज्ञान

एक वेळ कुंडलिनी उत्थापन होऊन प्राणाची गति सुषुम्नापंथाने होऊं लागली म्हणजे साक्षात्काराचे मार्गावरील अनुभव यावयास पाहिजेत हे लक्षात ठेवावे. अकारादि मात्रांचा लय होतांना साक्षात्काराचे मार्गावरील - या पंथराजाच्या मार्गावरील - अनुभव कसकसे येतात याचे वर्णन ज्ञानेश्वर महाराजांनी स्पष्टपणे केले आहे. ज्ञानेश्वरी हा श्रेष्ठ ग्रंथ बहुतेकांच्या वाचनांत असल्यामुळे त्याचेच अनुरोधाने या विषयाचे साकल्याने व सुसंगत विवेचन करूं. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, शक्तीची पहिली प्रगटावस्था - चैतन्याची पहिली चमक - या पंथराजावरील पहिल्या टप्प्याचे दर्शन म्हणजे अणुब्रह्माचे दर्शन होय!

**तेजाचे बिज विरूढले। अंकुरेसी॥**

ही प्रणवाची अकार मात्रा होय! या अवस्थेत प्रकाशाचे अत्यंत तेजस्वी बिंदू दिसूं लागतील. डोळे उघडे असोत अगर मिटलेले असोत ते दिसतीलच. कारण ज्ञानचक्षू उघडलेला असतो. आपल्या इंद्रियांना विशिष्ट मर्यादेपर्यंतच ज्ञान होऊं शकते. डोळ्यास ठरावीक मर्यादेपलीकडील किंवा अत्यंत सूक्ष्म असे पदार्थ दिसत नाहीत या अवस्थेत आपल्या इंद्रियांच्या ठिकाणी विशिष्ट ज्ञान (Special sense) उत्पन्न होते. जड इंद्रियांना न दिसणाऱ्या वस्तूही आपणांस दिसू लागतात. आकाशापेक्षां विरल असे Ether नावाचे सूक्ष्मतर एक तत्त्व आहे असे पाश्चात्त्य तत्त्वज्ञानी मानीत होते त्याहीपेक्षां सूक्ष्मतर तत्त्वे कालांतराने निघत आहेत. पण जडापलीकडे असणाऱ्या व स्वयंप्रकाश अशा सर्वव्यापी वस्तूचे ज्ञान या अवस्थेत इंद्रियांच्या ठिकाणी उत्पन्न होते. त्यास अतींद्रिय ज्ञान म्हणतात.

**जें दिठीही न पविजे। तें दिठीवीण देखिजे।**
**जरी अतिंद्रिय लाहिजे। ज्ञानबाळ।।**

**- ज्ञानेश्वरी**

कर्णाच्या ठिकाणी बाह्यसृष्टींतील आघातापासून उत्पन्न होणारे आवाज ऐकण्याची शक्ति आहे. पण त्याच्या ठिकाणी अतींद्रिय ज्ञान उत्पन्न झाले म्हणजे आघाताशिवाय अन-आ-हत-अनाहत ध्वनि उत्पन्न होऊं लागतो. त्यास अनुहत ध्वनि असेही म्हणतात. त्याचप्रमाणे चर्माच्या ठिकाणी विशिष्ट प्रकारचे स्पर्शज्ञान, जिव्हेच्या ठिकाणी उत्तमोत्तम अमृततुल्य

रसज्ञान व घ्राणाच्या ठिकाणी विशिष्ट व अत्यंत सुगंधी असे गंध, या अवस्थेत उत्पन्न होऊं लागतात.

## साक्षात्कार

जसजसा जास्त अभ्यास होऊन चित्तैकाग्र्य वाढत जाईल तसतसे अतींद्रिय ज्ञान जास्त प्रगटस्वरूपांत अनुभवास येत जाईल. अणुब्रह्माचे रूपांतर पिंडाचा साक्षी जो अंगुष्ठमात्र आत्मा, त्याच्या दर्शनांत होईल! आत्म्याचे स्वरूप प्रकाशमय व अंगुष्ठमात्र असे रवितुल्यरूप आहे, असे श्रुतिमध्येही सांगितले आहे.

**अंगुष्ठमात्रः पुरुषोन्तरात्मा। अंगुष्ठमात्रो रवितुल्यरूपः।**

विराट्स्वरूपाची ही अकार मात्रा होय.

ह्या अकार मात्रेचा लय उकार मात्रेत होतो. या अवस्थेमध्ये अनुहतध्वनीचे निरनिराळे प्रकार ऐकावयास मिळतात. किंकिणी, चिंचिणी, घंटानाद, वेणुनाद, भ्रमरगुंजारव वगैरे प्रकारचे दशविध नाद आहेत. ही ब्रह्माचीच रूपे आहेत असे उपनिषदांतही सांगितले आहे. वायु हा आकाशांत लीन होतो. जोपर्यंत तो लीन झाला नाही तोपर्यंत त्याचा ध्वनि होणारच. लय परब्रह्मस्वरूपांत झाला नाही तोपर्यंत अनुहतध्वनीचा गजर सुरू राहणार!

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात :-

**विसरोनी गेलों अर्जुना। जंव नाश नाहीं पवना॥**

**तवं वाचा आथी गगना। म्हणवुनि घुमे॥**

आत्म्याचे ध्यान करता करता प्रकाशरूपाचे निरनिराळे अनुभव येऊ लागतात. या अनुभवाचे विस्ताराने वर्णन ज्ञानेश्वरांनी आपल्या अभंगात ठिकठिकाणी केले आहे. ज्ञानेश्वरीत या तेजस्वी दृश्याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

**तैसी हृदयकमलवेऱ्हीं। दिसे जैसी सोनियाची सरी।।**
**नातरी प्रकाशजळाची झरी। वहात आली।।**

कुंडलिनी उत्थापन झाल्यावर प्राण सुषुम्नापंथाने म्हणजे मध्य मार्गाने जाऊ लागतो. हा मध्यमार्ग ध्यानावस्थेत वर वर्णन केल्याप्रमाणे प्रकाशरूप दिसतो.

## ही उकार मात्रा होय.

या उकार मात्रेचा लय मकार मात्रेत होतो. या अवस्थेत कुंडलिनीचे प्रखर तेजाचे स्वरूप जाऊन ती शक्तिरूप होते! मेघांच्या घर्षणाने विद्युल्लता ही तेजरूपात प्रगट होते व नंतर नाहीशी होते म्हणजे सर्वत्र व्यापी मूळस्वरूपी होते; त्याप्रमाणे प्रकाशाचे विविक्षित अंगुष्ठप्रमाणरूप जाऊन तो सर्वत्र भरलेला असा मूळ स्वरूपांत असतो. तेजाचे विशिष्ट दृश्यस्वरूप सूर्य आहे. तो उदय पावण्यापूर्वी किंवा अस्ताचलास गेल्यानंतर देखील प्रकाशरूपी व सर्वत्र व्यापक अशा स्वरूपांत असतो. त्याप्रमाणे अंगुष्ठमात्र आत्म्याचा लय सर्वव्यापी अशा प्रकाशरूप परमात्म्यांत होतो. त्यावेळी सर्वत्र प्रकाश एकजिनसी भरलेला अनुभवास येतो. हा प्रकाशरूप परमात्मा होय! ज्ञानेश्वर महाराज अमृतानुभवांत दृष्टांत देताना ही गोष्ट सांगतात -

**कीं विश्वचि केवळ। वाढे जे सूर्यमंडळ।**
**तें तेजोमय निखिळ। तेच होय।।**

आत्मा व परमात्मा, पिंड व ब्रह्मांड यांच्या ऐक्याचे हे रहस्य आहे. ही मकार मात्रा होय. या मकार मात्रेचा लय अर्धमात्रेत होतो!

या अवस्थेत प्रकाश व नाद यांचे ऐक्य अनुभवास येते. यावेळी शेवटचा जो नाद म्हणजे स्पष्ट प्रणवध्वनि तो ऐकू येऊ लागतो. अर्धमात्रा ही तुर्या अवस्था आहे. ही अवस्था तुर्येचीही तुर्या म्हणजे ब्रह्मांडाची तुर्यावस्था होय.

यावेळी कुंडलिनी शक्तीचे कुंडलिनी हे नांव नाहीसे होते. ती स्फुरणरूप होते. तिला मारुत असे नामाभिधान मिळते. यास नादपुरुषाचा साक्षात्कार म्हणतात. हिचे शक्तिरूप पुढे ती शिवरूपात जाईपर्यंत म्हणजे परब्रह्मस्वरूपी लीन होईपर्यंत रहाते.

**ते वेळीं कुंडलिनी। हे भाष जाये।**
**मारुत ऐसे नाम होये।।**
**परी शक्तीपण ते आहे। जंव न मिळे शिवीं।।**

या नादावर अनुसंधान ठेवणे यास नादानुसंधान म्हणतात. या नादानुसंधानाचे वर्णन आद्य श्रीशंकराचार्य यांनी योगतारावली ग्रंथांत अत्यंत बहारीने केले आहे. या नादाचा लय शेवटी परब्रह्म स्वरूपांत होतो. शक्तीचा लय शेवटी शिवस्वरूपांत होतो. शेवटचा नाद जो प्रणवध्वनि तो सतत कर्णांत घुमत राहणे हे खरे अखंडनामस्मरण होय.

ज्ञानेश्वर महाराज एका अभंगात म्हणतात :-

**सार सार विठोबा नाम तुझें सार।**

**आदि मध्य अंती निजबीज ओंकार॥**

यावेळी प्राण अग्निचक्रावरून ब्रह्मरंध्रांत स्थिर होतो. यावेळी फक्त एकच सो ऽ हं ही वृत्ति असते. तिच्या अनुसंधानाने शेवटी परब्रह्म स्वरूपांत लीन व्हावयाचे असते.

## ही अर्धमात्रा

अकारादि चारी मात्रा ओलांडल्यावर शेवटी अर्धमात्रेचा लय परब्रह्मस्वरूपांत होतो. परब्रह्मस्वरूपाचे वर्णन ज्ञानेश्वर महाराजांइतके दुसऱ्या कुणीही केलेले नाही. परब्रह्मस्वरूप हे कसे आहे हे मुळीच सांगता येणार नाही. शब्दाचा अतिरेक करून सांगावयाचे म्हटले म्हणजे ते गगनासारखे आहे असे सांगता येईल. हे स्वरूप परेच्या अतीत आहे. नादाससुद्धा येथे शिरकाव नाही. मग वर्णन मुखाने कसे होणार? मौन धरणे हेच याचे वर्णन होय! ज्ञानेश्वर महाराज अमृतानुभवांत म्हणतात,

**कां परेसी पडे मिठी। तेथें नादा सळू नुठी।**

**कां वावरिजेल ओठी। हें कें असे॥**

प्राण सहस्रदलकमलांत स्थिर झाला म्हणजे नाद किंवा अर्धमात्रारूपी सोऽहंवृत्ति गगनस्वरूपांत लीन होते. सो ऽ हं भावाचे सकार व हकार हे दोन हात पसरून परमात्मलिंगास आलिंगन दिले की आपण स्वये परब्रह्म होतो. ऐक्य झाल्यावर गगनस्वरूप आपण होतो असेही म्हणता येत नाही! गगनात

गगन लय पावते असे जे म्हणतात ती अवस्था ही होय! यापुढे जाणावयाचे असे कांही नाही. 'सा काष्ठा सा परा गतिः।' असे उपनिषदांत म्हटले आहे. हीच शेवटची अवस्था होय. हा खरा साक्षात्कार होय. ज्ञानेश्वरमहाराज ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत याचे फार रसभरित व आनंदाच्या ऊर्मी उठविणारे वर्णन करितात :-

**पुढें तन्मात्रा अवधारी। आकाशाच्या अंतरी।**
**भरती गमे सागरीं। सरिता जेवीं॥**
**मग ब्रह्मरंध्री स्थिरावोनी।**
**सोऽहंभावाच्या बाह्या पसरोनी।**
**परमात्मलिंगा धावोनी। आंगा घडे॥**
**गगनी गगन लया जाये। ऐसे जें कांही आहे।**
**ते अनुभवें जो होये। तो होऊनि ठाके॥**
**जे उन्मनीयेचें लावण्य। जे तुर्येचें तारुण्य।**
**अनादि जें अगम्य। परमात्म तत्त्व॥**
**जें विश्वाचें मूळ। योगद्रुमाचें फळ।**
**जें आनंदाचे केवळ। चैतन्य गा॥**
**आकाराचा प्रांत। जो मोक्षाचा एकांत।**
**जेथें आदि आणि अंत। विरोनी गेले॥**
**जें महाभूतांचें बीज। जे महातेजाचे तेज।**
**एवं पार्था जें निज। स्वरूप माझें॥**



## प्रकरण ११ वे

# सिद्धि व चमत्कार

कुंडलिनी शक्ति जागृत झाली व प्राण चक्रभेदन करून विशिष्ट मार्गांने जाऊ लागला म्हणजे अतींद्रिय ज्ञान प्राप्त होते हे मागे सांगितले. त्याचप्रमाणे एक प्रचंड शक्तीही उत्पन्न होते. यांत आश्चर्य अगर अशक्यता वाटणेचे कारण नाही. शरीरांतील प्राणशक्ति एकवटून ती विशिष्ट मार्गांने जाऊ लागली अगर आपणास नेता येऊ लागली म्हणजे लोकविलक्षण चमत्कार आपणास करून दाखविता येतील. व्यवहारांतही आपण हे पाहतो. शारीरिक बलाचे प्रयोग प्रो. राममूर्तिसारखे लोक करून दाखवीत होते किंवा मसलकंट्रोलसारखे प्रयोग त्या शास्त्रांतील आधुनिक प्रोफेसर जेव्हां करून दाखवितात, तेव्हां ते याचे रहस्य म्हणून सांगतात की 'इच्छाशक्तीच्या जोरावर (नर्व्हफोर्स किंवा माइंड फ़ोर्सवर) आम्ही हे प्रयोग करून दाखवितो.' मानसशास्त्राचे शास्त्रज्ञ म्हणतात की आपल्या शरीरांतील विद्युत्शक्ति नेत्रद्वारा किंवा हाताच्या बोटांच्या द्वारा, दुसऱ्याच्या शरीरांत घालता येते व त्यायोगे त्याच्या मनावर व ज्ञानतंतूंवर ताबा मिळवता येऊन, त्यास झोप आणणे अगर त्याजकडून लांबच्या गोष्टी पाहून सांगविणे वगैरे चमत्कार करून दाखवितां येतात. यावरून असे दिसून येईल की, आपल्या शरीरांतील विद्युत्शक्तीचा उपयोग बाह्य जगावर सुद्धा इच्छेप्रमाणे करता येतो. आपले शरीर हे एक विद्युतूयंत्र बनते! आधिभौतिक

शास्त्राचे कितीतरी चमत्कार आपणास हल्ली दिवसानुदिवस वाढत्या प्रमाणांत पहावयास सापडतात. बिनतारी संदेश पाठविण्याची कला निघाल्यापासून जगांतील जीवनक्रमांत क्रांतीच घडवून आणली आहे. रेडिओचे प्रस्थ जिकडे तिकडे माजले आहे. याच्यायोगे हजारो मैलांच्या वरून प्रत्यक्ष शब्द ऐकूं येतात. एवढेच नव्हे, तर माणसांची छायाचित्रेही घेतां येतात. वातावरणांतून अत्यंत सूक्ष्म वायुलहरी जशा एकसारख्या जातात तशाच प्रकाश किरणांच्या लहरीही जातात असे शास्त्रांचे सांगणे आहे. या सूक्ष्मलहरी घेण्याकरिता विशिष्ट प्रकारची यंत्रे आहेत. ही यंत्रे जेथे जेथे असतील तेथे तेथे वायुलहरी अगर प्रकाशलहरी घेतल्या जातात. या यंत्रांतून विद्युत् असावी लागते. हे चमत्कार जर प्रत्यक्ष आपण पाहतो तर ज्ञानेश्वर महाराजांसारख्या सत्पुरुषांनी केलेले चमत्कार खोटे आहेत अगर अशक्य आहेत असे मानण्याचे कारण काय? त्यांची शरीरे म्हणजे रेडिओची यंत्रेच तयार झाली होती. त्यांत विद्युत्शक्ति परिपूर्ण भरलेली होती, इतकी की, वातावरणांतील कोणत्याही सूक्ष्मात्सूक्ष्मतर अशा लहरींचा आघात त्या ठिकाणी जाणवला जात होता! आत्म्याचा साक्षात्कार होऊन आत्मशक्तीशी तादात्म्य पावता येऊं लागले म्हणजे वातावरणाची अगर आकाशाची जेथपर्यंत गति आहे तेथपर्यंत आपली गति होणे साहजिक आहे. जगात कोठेही काय चालले आहे हे पाहतां येणे शक्य आहे. कोण काय बोलत आहे अगर कोठे काय शब्द होत आहेत हे ऐकणे शक्य आहे. त्याचप्रमाणे

स्पर्श, रस, व गंध याही गुणांचे घ्यावे. रेडिओने जसे संदेश दुसरीकडे पाठविले जातात तसेच या अतींद्रिय ज्ञात्यासही जगांत कोठेही संदेश पाठवितां येतील. संदेश स्पष्ट रूपांत देतां येईल अगर अस्पष्ट रूपांतही देता येईल. जेथे तसले दुसरे बिनतारी संदेशयंत्र - दुसरा ज्ञानी - असेल त्यासही संदेश घेतां येतील व पाठवितां येतील. परमेश्वराकडून मला संदेश मिळाला अगर अमुक थोर विभूतीकडून संदेश प्राप्त झाला किंवा ऐकू आला' असे थोर पुरुष म्हणतांना आपण ऐकतो. मनाचा संपूर्ण लय करूनही आत्म्याशी अगर क्रमाने सर्वव्यापी अशा परमात्म्याशी तादात्म्य पावता येण्याची कला साधली म्हणजे त्रिभुवनावर सत्ता चालविण्याची शक्ति आपोआप उत्पन्न होते.

ज्ञानेश्वर महाराजांनी देहांत अग्नि उत्पन्न करून पाठीवर मांडे भाजवून घेतले, अगर रेड्यामुखी वेद बोलविले यांतील रहस्य आता कळून आले असेलच. रेड्याच्या ठिकाणी चैतन्य तरी होते. पण चैतन्यविरहित अशी जड भिंत चालूं लागली हे महदाश्चर्य नव्हे काय? जडाचा पगडा चैतन्यावर बसत नाही हे आपण हल्लीही पाहतो. अणकुचीदार लोखंडी खिळ्याच्या अंथरुणावर खुशाल निजून अंगावर कित्येक मणाचे ओझे घेतले तरी इच्छाशक्तीच्या जोरावर शरीरास यत्किंचित्‌ही इजा न होतां ते वजन घेतां येते. असले प्रयोग हल्ली आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात यावरून असे स्पष्ट दिसते की, जड वस्तूही आपली कार्ये विसरतात! कारण शरीरांतील चैतन्यशक्ति एकवटून त्यांच्यापुढे

उभी केलेली असते. जडाच्या ठिकाणीही चैतन्य उत्पन्न करण्याची कला आत्मशक्तीचे ठिकाणी असते.

मनोलय होऊन समाधि अवस्था जसजशी साध्य होत जाईल तसतशा एकएक सिद्धि प्राप्त होऊ लागतात. बुद्धिप्रामाण्यवाद्यांच्या पद्धतीने विचार करतां त्यांनाही विचारांती असे दिसून येईल की, सिद्धि या क्रमप्राप्त आहेत. हटयोग अगर सिद्धि या शब्दास भिण्याचे किंवा घाबरून जाण्याचे कारण नाही. कुंडलिनीशक्ति जागृत झाली म्हणजे सिद्धि सहज साध्य आहेत. कुंडलिनी हटयोगाने, मनोलयाच्या कोणत्याही अभ्यासाने, आत्यंतिक भक्तियुक्त अंत:करण होऊन ते परमेश्वराच्या ठिकाणी लीन केल्याच्या योगाने किंवा सद्‌गुरूंनी कृपा केल्यावर लगेच जागृत होते! हे मागे सांगितले आहेच.

सिद्धि प्राप्त झाल्या तरी, खरे ज्ञान होऊन निरतिशयानंद सुखप्राप्ति ज्यास करून घ्यावयाची आहे त्याने यांचा उपयोग करू नये कारण त्यापासून होणारे फायदे जड आहेत, मायिक आहेत. आपणास जडाच्या अतीत जावयाचे आहे. मायेच्या पलीकडे असलेल्या परब्रह्मस्वरूपाचे ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचे आहे त्यास मायेचा खेळ सोडला पाहिजे. सिद्धीच्या मागे लागला की तो मायाजालांत गुरफटला जातो व कालांतराने अधोगति प्राप्त होते. जो परब्रह्मस्वरूपी 'सोऽहं' वृत्तीसह लीन होतो त्यास मायेचा स्पर्श बांधू शकत नाही.

राजाचे दर्शनास गेल्यावर राजवाड्यांतील नानाप्रकारचे महाल व इतर पदार्थ यांची शोभा पहात बसले तर त्यांतच गढून जाऊन

राजदर्शन घेण्याचे विसरून जाईल. ते लांबच राहील व होणारही नाही. त्याप्रमाणे सिद्धीची मजा पहात बसले व त्यांत गुंग झाले की, आत्मया राजाचे दर्शन होणार नाही.

## योग साध्य होऊ लागल्याची लक्षणे

कोणत्याही प्रकारच्या मनोलयाच्या अभ्यासाने चित्ताची एकाग्रता प्राप्त होऊ लागली म्हणजे वृत्ति हळूहळू शांत होऊ लागतात. इंद्रियांचे चांचल्य जाऊन ती शांत व प्रसन्न होऊ लागतात व मन प्रसन्न होते. मनाचे प्रसन्नतेवर शरीराचे आरोग्य अवलंबून आहे. चित्ताची तन्मयतदाकारता झाली म्हणजे प्राण सुषुम्नापंथांत शिरून कुंडलिनी उत्थापन होते. त्याचे पहिले लक्षण म्हणजे विष्ठा व मूत्र अल्प होते. दिवसांतून एक वेळच शौच व १-२ वेळच लघवी होते. अंगी सुगंध येतो व दृष्टि स्वच्छ होते.

त्याचे दुसरे लक्षण म्हणजे अंत:करण प्रसन्न होऊन त्या ठिकाणी आनंद होतो. शरीर कृश होते. पण अंगावर कांति येते. डोळ्यांत विशिष्ट प्रकारचे तेज चमकू लागते!

तिसरे लक्षण असे की, शीत व उष्ण यांची बाधा होत नाही. कितीही कडक उन्हात उघडे बसता अगर फिरता येते. तसेच थंडीतही उघडे हिंडल्यास त्याची बाधा होत नाही. मनांत निर्भयता उत्पन्न होते. जनी, वनी कोठेही भीति अशी उत्पन्न होत नाही. मनास दार्ढ्य येते व मनाची स्थिरता उत्पन्न होते.

## उपसर्ग

ही लक्षणे अभ्यासी पुरुषाने आपल्या अंगी किती प्रमाणांत येत आहेत हे ताडून पहावे. ह्याचा अनुभव ज्याचा त्यासच येणार, हा योग आहे. हा साध्य होऊ लागला की त्यामध्ये कित्येक अडथळे व विघ्ने येतात. त्यास उपसर्ग म्हणतात. हे उपसर्ग कोणते आहेत याची माहिती पाहिजे. कारण हे प्राप्त झाले की, अभ्यास सोडावा असे वाटूं लागते व मग अधोगतीचे मार्गास लागण्याचा संभव असतो असे अभ्यासी पुरुषाने जाणावे व यापासून दूर रहावे. ते उपसर्ग असे -

प्रथम काम्यकर्म करावे अशी इच्छा उत्पन्न होते. ती झाली की, अनुष्ठानाची गोडी लागते. देव लगेच फल देतात. त्वरित फल मिळूं लागले की, द्रव्याची लालूच लागते. त्याचा मोह उत्पन्न होतो. द्रव्यप्राप्ति होऊ लागली म्हणजे भोग भोगावे अशी इच्छा उत्पन्न होते. कनकाचा मोह उत्पन्न झाला की कांतेचा मोहही त्या ठिकाणी आपोआप येतोच. त्याचे आत्मिक पुण्याईवर स्त्रियाही वश होतात व त्यांचे भोगही मिळतात. पुढे नानाप्रकारच्या इच्छा उत्पन्न होतात. देव सर्व इच्छा पुरवतात व सर्व ऐहिक भोग प्राप्त करून देतात. असे केल्याशिवाय तो लवकर अधोगतीस कसा जाईल? पुढे पुढे इच्छा होताच द्रव्य मिळते. मनांत कोणतीही गोष्ट करावी असा संकल्प झाला की, लगेच त्याचे फलही मिळते. त्यामुळे लोकांत हव्या त्या लोकविलक्षण गोष्टी करून दाखवितां येतात! येणे करून लोक वश होतात. नानाप्रकारच्या विद्याही प्राप्त होतात. इंद्रजाल

करून दाखवितां येते. मंत्र व तंत्र व सामर्थ्य प्रगट करून चमत्कार करता येतात. इच्छा उत्पन्न झाली की राजोपचार व राजाचे भोग मिळविता येतात. येवढेच नव्हे तर एकादे राज्यावर राज्यपदारूढ होऊनही दाखविता येते. लोकमान्यता हवी तेवढी प्राप्त होते. लोकांकडून मानमान्यता, पूज्यता मिळते; इतकेच काय पण देवाप्रमाणे पूजाही होते! अल्प आहार करता येतो. आकाशगमन, वशीकरण व स्वैरगमनासारखे चमत्कार करून दाखविता येतात; फार काय पण त्रिकाल ज्ञानही प्रगट करता येते!

हे सर्व उपसर्ग म्हणजे ही आत्मज्ञानाचे मार्गांत भयंकर विघ्ने होत! याने तपोभंग होतो, वृत्ति बाह्योन्मुख होतात व ज्ञान नष्ट होते. हे ओळखीचे चोर जीवे मारणारे आहेत हे ध्यानांत ठेवावे व यापासून दूर रहावे.

## उपाय

या उपसर्गांची बाधा न होऊं देण्यास उपाय आहेत. अभ्यासी पुरुषाने ते सतत अमलांत आणावेत म्हणजे यांची बाधा होणार नाही.

ज्ञात्याने वृत्ति अंतर्मुख करावी. सुविचाराने या सिद्धीचे भय मानावे व ध्यानधारणाभ्यासांत निमग्न असावे. ईश्वरावर दृढ विश्वास ठेवावा म्हणजे या सर्व विघ्नांचा नाश होतो. त्याचेवर निष्ठा ठेवून अभ्यास केला म्हणजे तो फसत नाही. अभ्यासी पुरुषाने सन्मान विषाप्रमाणे मानावा व अपमान अमृताप्रमाणे मानावा.

**दृक्पूतं विन्यसेत्पादम्। चित्तपूतंच चिंतयेत॥**

चालतांना दृष्टि ६ हात ठेवावी, शास्त्रशुद्ध वचन बोलावे. ज्याचे ध्यानाने अंत:करण शुद्ध होते त्याचे ध्यान करावे. श्री प. प. वासुदेवानंदसरस्वती स्वामी महाराज यांनी समाधि साध्य करून देणाऱ्या ध्यानाचा प्रकार थोडक्यांत सांगितला आहे तो खाली देत आहो. त्याप्रमाणे ध्यान करावे.-

**मी असे निरावरण। निर्विकारा म्हणून मज ध्यावें।**
**ह्या पायांपासून। करावें चिंतन।**
**अनुक्रमें करून। स्वरूपध्यान करावें ॥४५॥**
**ध्यान स्थिर झाल्यावरी। चित्त ठेवावें मुखावरी।**
**मग केवळ हास्यावरी। वृत्ती बरी धरावी ॥४६॥**
**ध्यानें तन्मय होतां। इतर चिंता न उठतां।**
**ये परमानंदता। ध्येयाकरिता होवोनी ॥४७॥**
**हें ध्यान पूर्वीं जरी। सगुण वाटलें तरी।**
**स्थिर होता अंतरीं। निर्गुण करी हेंचि अंतीं ॥४८॥**
**ध्येय ध्याता ध्यान। ह्या त्रिपुटीचें भान।**
**जोंवरी असे जाण। तोंवरी ध्यान म्हणती ॥४९॥**
**मी ध्याता हें ध्यान। हें न राहे भान।**
**ध्येयाकार होऊन। राहे मन निश्चळ ॥५०॥**
**ते न उठे अन्य वृत्ती। जेवी दीप निवांतीं।**
**तेंवी ध्येयाकार वृत्ती। स्थिर राहे तो समाधी ॥५१॥**

**- दत्तमहात्म्य ३४**

आतां अष्टमहासिद्धीचे व उपसिद्धीचे वर्णन करून हे प्रकरण संपवू. या सिद्धि कोणत्या व त्यांचे चमत्कार कसे आहेत हे माहीत पाहिजे. हल्ली जरा कोणी चमत्कार करून दाखविणारे भेटले की, सामान्य मनुष्य त्यास देवकोटीत घालतात व त्याचे भजन पूजन करून त्याचे मागे लागतात परंतु हे खरे आत्मज्ञान नव्हे. यापासून जन्ममरणाचे फेरे चुकणार नाहीत. निरतिशयानंद सुखप्राप्ति होणार नाही हे पक्के ध्यानांत ठेवावे. अशा चमत्कारास मुळीच भुलूं नये. आत्मज्ञान झाले की हे चमत्कार आपोआप होतात. तुकाराम महाराजांनी चंद्रभागेतून ओंजळभर नीळ रत्नाचे खडे काढून दाखविले नाहीत कां? सत्पुरुष चमत्कार करून दाखवीत नाहीत. कित्येक प्रसंगी त्यांचेकडून ते आपोआप घडून येतात. असो.

## अष्टमहासिद्धि व त्यांच्या धारणा

सिद्धि अनेक प्रकारच्या आहेत. त्यांमध्ये मुख्य ८ प्रकारच्या सिद्धि आहेत. त्या स्वाभाविक आहेत. त्यांस अष्टमहासिद्धि असे म्हणतात. याशिवाय एक एक प्रकारच्या अशा १० गौण सिद्धि आहेत. त्यांस उपसिद्धि म्हणतात. आणखी ५ तऱ्हेच्या क्षुद्र सिद्धि आहेत. जगत् पंचभूतात्मक आहे. त्यांपैकी एका एका महाभूताशी तादात्म्य पावता येऊं लागले म्हणजे त्या त्या महाभूतासंबंधी सर्व शक्ति प्राप्त होते. त्यांस धारणा म्हणतात. अशा धारणा धरता येऊ लागल्या म्हणजे सिद्धि आपोआप प्राप्त होऊ लागतात असे आपल्या शास्त्रांत सांगितले आहे. या सिद्धि

साध्य होण्यास विशिष्ट धारणा धरावयास पाहिजेत. कोणती धारणा धरली म्हणजे कोणती सिद्धि प्राप्त होते हीही माहिती खाली देत आहो. अर्थात् ही संक्षेपानेच असणार. कारण त्याची प्रत्यक्ष माहिती जाणत्याकडून करून घ्यावयास पाहिजे. शिवाय सिद्धीचा त्याग करावयाचा असल्यामुळे त्यांच्याशी आपणास कांही कर्तव्यही नाही.

धारणा ह्या परमात्म्याच्या स्वरूपाच्या आहेत. त्या त्याच्या निरनिराळ्या स्वरूपाच्या आहेत एवढे लक्षांत ठेवावे म्हणजे असे दिसून येईल की स्वस्वरूप जाणून घेऊन परमात्म्याशी लीन होता आले म्हणजे सर्व सिद्धि आपोआप प्राप्त होतात.

### १ अणिमा

ही सिद्धि प्राप्त झाली म्हणजे आपल्या इच्छेस येईल त्यावेळी आपणास अगदी अणुप्रमाणे होता येते. आपल्या देहापेक्षा जे लहान लहान प्राण्यांचे देह आहेत, ते धारण करता येतात. त्याहीपेक्षा अत्यंत सूक्ष्म जीवांचे देहही धारण करता येतात. येवढेच नव्हे तर भरीव पदार्थातूनही पार जाता येते! याचे उदाहरण म्हणजे लंकेमध्ये हनुमानराय रावणाचे महालांत जाण्यासाठी, तसेच सर्व लंकेचे सूक्ष्म शोधन करण्याकरितां अत्यंत सूक्ष्म देह धारण करीत होते व त्यायोगे बारीक फटींतून अगर छिद्रांतून त्यांना प्रवेश करून घेता येत असे!

धारणा - मन अत्यंत सूक्ष्म करून हृदयस्थ परमात्म्याशी लीन करणे यास अणुतन्मात्र ध्यान म्हणतात.

## २ महिमा

या सिद्धीचे योगे आपल्या देहापेक्षा केवढाही मोठा देह आपणांस धारण करता येतो. लंकेत हनुमंतानी याचा प्रभाव दाखविला आहे. भगवान् श्रीकृष्णांनी विश्वरूप दर्शन अर्जुनास करून दिल्याचे उदाहरण आहे. मारुतिरायांनी भीमासही असेच विश्वरूप दाखविले होते. या सिद्धीचे बळावर जे पूज्य असतील त्यांचे चिंतन करतांच त्याप्रमाणे आपणासही पूज्य होता येते.

धारणा - महत्त्वाची धारणा धरावी.

## ३ गरिमा

या सिद्धीचे योगे पर्वताप्रमाणे जडत्व अंगी आणता येते. कित्येक सर्कशींमधून अगर जाहीर प्रयोगांतून कित्येक तज्ज्ञ आपले शरीर अगदी जड करून दाखवितात. इतके की, कित्येक माणसांना ते उचलत नाही. एका बाईनेही हा प्रयोग करून दाखविल्याचे ऐकिवांत आहे. मग ही सिद्धि प्राप्त झाल्यावर पर्वताप्रमाणेही जड कां होता येऊं नये?

या सिद्धीचे जोरावर हवा तेवढा मोठेपणा प्राप्त करून घेतां येतो. देवाबरोबरचाही मोठेपणा मिळतो. इच्छिलेल्या काम-सुखाची प्राप्ति होते व त्रिभुवनाची भोग-संपत्ति मिळते.

धारणा - निर्गुण ब्रह्माची.

## ४ लघिमा

हिच्या योगे कापसाप्रमाणे अगदी हलके शरीर करतां येते. अत्यंत हलकेपणा आला की आकाशांत त्यास सहज उडतां येते व गमन करतां येते.

